






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य पत्रिका
जानेवारी ते डिसेंबर २००८.
अंक- ३२४ ते ३२७

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३२४ / जानेवारी ते मार्च २००८





संत तुकाराममहाराजांच्या
चौथ्या जन्मशताब्दी निमित्ताने
विशेष स्मरण

अनुक्रमणिका



अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

☐ अंक क्र. ३२४ : जानेवारी ते मार्च २००८

---



प्रकाशक :

**डॉ. माधवी वैद्य**




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
दूरभाष - २४४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**डॉ. माधवी वैद्य**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.**

संगणकीय अक्षरजुळणी, मुद्रणस्थळ
**जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा, सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१**

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : मार्च २००८

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**
फॉर्म नं. ४ नियम ८ अन्वये निवेदन
१) प्रकाशन स्थळ : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे-४११ ०३०.
२) प्रकाशनाचा काळ : त्रैमासिक
३) मुद्रक प्रकाशक : डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०
४) संपादक : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०
५) मालक : महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे - ४११०३०.
मी असे जाहीर करते की, वरील तपशील माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे खरा आहे.
**डॉ. माधवी वैद्य**
प्रकाशक

# देहबुद्धीचे मरण !

□ संपादकीय



*'ज्ञानेशो भगवान् विष्णुः'* हे महाराष्ट्रातील भागवत धर्माच्या उगमस्थानी, तर भागवतां खांब देणाऱ्या जनी जनार्दनाचे दर्शन घडविणाऱ्या, नाथांच्या भागवत धर्माचं शिखर तथा कळसाध्याय म्हणजे तुकोबांची चालती-बोलती वेदवाणी होय. जन आणि जनार्दन, नर आणि नारायण, विश्व आणि मानव यांचे नाते जोडणाऱ्या शतकोटी अभंगांचा संकल्प तुकाराम आणि तुकारामशिष्य निळोबाराय यांच्या काळात पूर्ण झाला. ज्ञान आणि भक्तीचा हा कळसाध्याय म्हणजे भागवतधर्माच्या ऋत-प्रेरणेचा लोकाविष्कार होय. अध्यात्मवादी लोक जगाविषयी उदासीन नसतात. 'जोडोनिया धन उत्तम वेव्हारे। उदास विचारे वेच करी।' सुमार्गाने मिळविलेले वैभव मानवमात्राच्या ठायी जेथे जेथे दुःख दिसेल ते दूर करण्यासाठी, स्वार्थाविषयी उदासीन राहून, परोपकारासाठी खर्च करावे; ही भागवतधर्माचीच प्रेरणा आहे. हा भागवतधर्माचा मूलाधार आहे. हे समाजस्तवन आहे. विराट समाजपुरुषाचे ते पूजन आहे. बहुविधसमाजाचे कल्याण आणि उन्नतीची प्रार्थना...! 'समुद्रपर्यन्तायाः' पसरलेल्या अवघ्या समाजाचे चिंतन प्रत्येक वेळी मंत्रपुष्पांजली वाहताना आपण करतो. 'ऋतमय सत्य' - गतिमान सत्य हा भागवतधर्माचा पाया आहे. जनी जनार्दनाचा प्रत्यय हे सकळ उपनिषदांचे सार आहे—

*'जनी आहे जनार्दन । त्या पहावया सांडी अभिमान।'*

असे शांतिब्रह्म एकनाथ सांगतात. ह्या गतिमान धर्मात समाजकल्याण-मानव कल्याण-उन्नत मानवावस्था हाच परमेश्वर आहे. ज्ञानेश्वरांपासून वारकऱ्यांमध्ये आलेली ही ऋतप्रेरणा जेव्हा जेव्हा विस्मरणात गेली, तेव्हा-तेव्हा महापुरुषांनी तिचे जागरण केले.

*'आम्ही वैकुंठवासी । आलो याच कारणासी ।*
*बोलिले जे ऋषी । साचभावे वर्ताया ।।'*

हे आपल्या अवतारकार्याचे रहस्य तुकोबा सांगतात. ज्ञानोबादि संतांचे आडरानात गेलेले मार्ग झाडून स्वच्छ करणे, सामान्यातल्या सामान्यालाही त्यावरून मार्गक्रमण करणे सोपे जाईल असा 'अधिकार तैसा करू उपदेश' हे तुकोबांच्या जीवनाचे ध्येय आहे. अहंता नसलेला निरीच्छ मार्ग अंगिकारताना तुकोबांना अग्निदिव्यातून जावे लागले. समाजपुरुषाच्या अंगी ही गतिमान सत्याची प्रेरणा-निष्काम कर्मयोगाची प्रेरणा-तुकोबांनी आपल्या जीवनप्रवासाने लोकांना दिली. तुकोबांचा जीवनप्रवास देहाकडून विदेहाकडे होता, देहबुद्धीचे मरण तुकोबाने पाहिले. ते कृतार्थ झाले !

*'आपुले मरण पाहिले म्या डोळा*
*झाला तो सोहळा अनुपम्य...'*

हा अभंग तुकोबाच्या महानिर्वाणासंबंधीचा आहे असे मानले जाते. 'जनी जनार्दन' पहायचा असेल तर प्रथम अहंता दूर करावी लागते. ती त्यांनी प्रयत्नपूर्वक दूर केली. *'हाती घेऊनिया काठी । तुका लागे कलेवरापाठी ।'* अहंता दूर करण्यासाठी त्यांनी आत्मक्लेशाचा मार्ग स्वीकारला. कांद्याचा एक-एक पापुद्रा दूर केल्यावर हाती काहीच रहात नाही, तसे तुकोबांनी काम-क्रोध-मोह-मद-मत्सरादि पापुद्रे आपल्या हाताने दूर केले आणि विदेही झाले. आपला



अनुक्रमणिका

मरणसोहळा आपल्या हाताने केला. 'याचसाठी अट्टाहास केला होता.' तृष्णेच्या धावा खुंटल्या ! उपकारा पुरता उरलो ! अहंभावनेने मनुष्य दुबळा होतो. स्वतःचेच कोड पुरविण्यात त्याचे जीवन वाया जाते. तो कसला जनांचा उद्धार करणार ? स्वतः बुडणारा बुडणाऱ्या जनांना कसा हात देणार ? स्वार्थी समाजसेवक समाजसेवेचे ढोंगच करणार. या ढोंगावर प्रहार करायचे असतील तर आधी देहबुद्धीतून स्वतः दूर झाले पाहिजे. ते अग्निदिव्य तुकोबांनी केले; आणि सामर्थ्यवान झाले.

*'आता मी सर्वथा नव्हे गा दुर्बळ*
*यातिकुळ हीन दैन्यवाणा ।'*

याति आणि कुळ यांच्या पलिकडे गेलेल्या विदेही तुकोबांनी आपल्या वाणीच्या सामर्थ्याने ढोंगावर प्रहार केले. निर्मळ समाजनिर्मितीच्या आड हे ढोंग आले होते. त्याचा यथेच्छ समाचार त्यांनी घेतला.

*'अर्थे लोपली पुराणे । नाश केला शब्दज्ञाने ।।'*

ही त्यांची व्यथा होती. शब्दपंडितांनी धर्माला कर्मकांडात गुंतविले. अशा ढोंगी गुरूवरही त्यांनी शब्दांचे शस्त्र करून आघात केले; आणि एका विशुद्ध भक्तिभावनेचीच महती गायिली.

*कासया पाषाण पूजिती पितळ।*
*अष्ट धातू खळ भावेंविण ।।*

देहबुद्धीचे हे सर्व अडथळे तुकोबांनी पार केले; आणि आपला अंवघा संसार लोकार्पण केला.

तुकोबांच्या अभंगवाणीने वेदविचार लोकप्रिय झाला.

'जनी-जनार्दनाचा' एकनाथोक्त भागवतधर्म तुकारामांच्या अभंगांनी महाराष्ट्राच्या तळागाळापर्यंत सर्वतोमुखी झाला. रेड्याच्या मुखी वेदवाणी वदविण्याचे ज्ञानोबांचे ध्येय तुकोबांनी कळसाला नेले, महाराष्ट्राचे सामुदायिक मन-एक कणखर त्यागशील, भक्तिवैराग्याने भारलेला वैकुंठपीठाचा अधिकारी-समाज निर्मिण्याचे कार्य तुकोबांच्या वेदवाणीने केले. तुका आकाशाएवढे झाले ! यष्टी कडून समष्टीमय झाले !

म्हणूनच— *वेदाचा तो अर्थ आम्हासीच ठावा ।*
*येरांनी वाहवा भार माथा !*

हे तुकोबांचे आत्मोद्गार अनुभवामृताचे आहेत.

-सु.र.कुलकर्णी
७, गायकवाड कॉलनी, सावेडी मार्ग,
अहमदनगर - ४१४००१.

[वरील संपादकीय प्रा. श्री. रं. कुलकर्णी, श्री. ल. वि. परळकर, श्री. शं. वा. दांडेकर इत्यादींच्या संदर्भग्रंथांतून आकारास आणले आहे.]

## कै. डॉ. यशवंत दिनकर (तथा य. दि.) फडके – विचारवंत साहित्यिक

### (दि. ३ जानेवारी १९३१ ते ११ जानेवारी २००८)

महाराष्ट्राच्या आधुनिक कालखंडाचे इतिहासकार, संशोधक चरित्र लेखक, विचारवंत, संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचे भाष्यकार, इ. २००० च्या बेळगाव साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, महात्मा गांधी अध्यासन आणि एशियाटिक सोसायटी, मुंबईचे पदाधिकारी आणि मराठी व इंग्रजी साहित्यात एकूण ६२ विचारप्रधान ग्रंथांची मोलाची भर टाकणारे डॉ. यशवंत दिनकर तथा य. दि. फडके यांचे ११ जानेवारी रोजी देहावसान झाले. जन्म सोलापूरचा, पुणे आणि मुंबई विद्यापीठात अध्यापन कार्य- राज्यशास्त्राचे अभ्यासक आणि विचारवंत म्हणून ते सुपरिचित आहेत.

महाराष्ट्राच्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक बुद्धीने लालित्यपूर्ण शैलीत लिहिलेले चरित्रग्रंथ शोध बाळ-गोपाळांचा, र. धों. कर्वे, केशवराव जेधे, शोध सावरकरांचा, लोकमान्य टिळक आणि क्रांतिकारक, विष्णुशास्त्री चिपळूणकर, अण्णासाहेब लठ्ठे, आगरकर– हे मोलाचे संदर्भग्रंथ आहेत. 'कहाणी सुभाषचंद्रांची' हे ललितचरित्र, याशिवाय न. र. फाटक, आचार्य अत्रे, दत्तो वामन पोतदार, विश्राम बेडेकर, स. गं. मालशे, खाशाबा जाधव, इ. स्फुट चरित्रलेखन त्यांनी केले. विसाव्या शतकातील महाराष्ट्र (१९०१ ते १९४७) ह्या महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासाचे ८ खंड, डॉ. आंबेडकर व कार्य, काळाराम मंदिर सत्याग्रह, इंडियन नॅशनल काँग्रेस हे ग्रंथ महाराष्ट्राच्या राजकीय सामाजिक इतिहासाचे चारित्र्य विशद करणारे आहेत.

'दृष्टादृष्ट', 'शोधता-शोधता', 'स्मरणरेखा', 'नाही चिरा नाही पणती' हे ललित ग्रंथ, चरित्र आणि इतिहास यांचे अतूट नाते सिद्ध करणारे आहेत.

महाराष्ट्र-साहित्याच्या इतिहासातील हा वैचारिक प्रवास पार्थिवरूपाने संपला असली तरी ग्रंथरूपे उरलेला आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने डॉ. य. दि. फडके यांना आदरपूर्वक श्रद्धांजली !



अनुक्रमणिका

# तुका झालासे कळस !

☐ रामकृष्ण गवळीराम गायकवाड



*'तुका झालासे कळसं । भजन करा सावकाश ।।'*

संत बहिणाबाईंचा हा अभंग वाचताना तुकोबारायांचे वारकरी संप्रदायाच्या मंदिरावरील कळसासारखे अत्युच्च अन् अढळ स्थान समोर आल्यावाचून राहात नाही.

कळस म्हणजे मंदिराचे झळाळणारे आणि झगमगते सर्वोच सौंदर्य... काळाच्या दृष्टीने विचार करता महाराष्ट्र संतमंडळातील तुकोबाराय हे अखेरचे संतश्रेष्ठ. कालानुक्रमानुसार तुकोबारायांचे कार्य संतमंडळाच्या पूर्णतेच्या दृष्टीने कळसच होय. इतर संतवाङ्मयाला न मिळालेले भाग्य तुकोबारायांच्या वाङ्मयाला मिळाले, ते म्हणजे अभंगांना मिळालेली दिव्य जलसमाधी. हाही कळसच म्हणावा लागेल. ज्ञानोबा माऊलींनी भित चालविली, रेड्याच्या मुखातून वेद वदविले, संत नामदेवांनी विठ्ठलाला प्रत्यक्ष जेवायला लावले. या घटनांपेक्षाही तुकोबाराय सदेह वैकुंठाला गेले ही घटना कळसच ठरली. स्वतःच्या शुद्रत्वाचा जाणिवपूर्वक सहेतुक केलेला उच्चार ही कळसच ! ''वेदांचा तो अर्थ आम्हासीच ठावा'' या भाषेत शुद्रांचा वेदांवर सांगितलेला अधिकारही कळसच ! 'जगाच्या कल्याणा'साठी मऊ मेणांहून 'विष्णुदासाची' भूमिका घेणारे तुकोबाराय आपल्या शब्दांना धारदार शस्त्राचे सामर्थ्य देतात, हाही कळसच ! विश्वनिर्मात्याशी सलगी जोडणारी त्यांची रसाळ काव्यात्मशक्ती हाही कळसच. परमात्म्याच्या भक्तिसागरात आकाशभरारी घेऊन आकाशाचे व्यापकत्व घेणारे तुकोबाराय, हाही कळसच!

महाराष्ट्रातल्या वारकरी संप्रदायाच्या इतिहासात तुकोबारायांना भागवतधर्माच्या मंदिरावरचा कळसच मानले जाते. देवाच्या दर्शनासाठी आसुसलेल्यांना देवळाच्या कळसाचे दर्शन झाले तरी पुरे असते. सर्व संतवर्यांचे शिकवणुकीचे सार तुकोबारायांच्या शिकवणुकीत सापडते. या सत्यार्थानेच तुकोबारायांना भागवतधर्माचा कळस म्हणण्याची भूमिका निर्माण झाली.

तुकोबारायांच्या अभंगातील शिकवणुकीतच वारकरी संप्रदायाच्या जीवनमार्गाचे रहस्य सापडते. वारकरी संप्रदायाच्या उगमस्थानापासूनचा हा जीवनमार्ग तुकोबारायांच्या अभंगवाणीत दृष्टीस पडतो.

महाराष्ट्र संतमंडळातील ज्ञानोबामाऊली, नामदेवमहाराज, नाथमहाराज, तुकोबारायांनी वारकरी संप्रदायाचे हे विशाल मंदिर उभारले. पाया एकाने रचला, खांब रचणारा दुसरा तर कळस चढविणारा तिसरा. असे असले तरी या मंदिरातला देव मात्र अतिमहत्त्वाचा. तो कोणी बसविला ? तुकोबाराय म्हणतात– तो अगोदरच बसवला गेला आहे.

तुकोबाराय सांगतात,

*पुंडलिक भक्तराज । जेणे साधियलें काज ।।*
*वैकुंठीचे निज । परब्रह्म आणिले ।।*
*पांडुरंग बाळ मूर्ती । गाई गोपाळ सांगाती ।।*
*येऊनिया प्रीती । उभे समर्थी राहिले ।।*

भक्त पुंडलिकाने वैकुंठीचे परब्रह्म पांडुरंग बालमूर्तीच्या रुपाने पंढरपूर क्षेत्री भीमातीरी आणले.



अनुक्रमणिका

तुकोबाराय म्हणतात–

*वैकुंठा जावया तपाचे सायास ।*
*लागे जीवा नाश करणे बहुत ।।१।।*
*तया पुंडलिके केला उपकार ।*
*फेडावया भार पृथ्वीचा ।।२।।*
*तुका म्हणे सोपी केली पायवाट ।*
*पंढरी वैकुंठ भूमीवरी ।।३।।*

इहलोकीच्या सामान्य विठ्ठलभक्तांच्या दृष्टीने पुंडलिकाने वैकुंठीचे परब्रह्म पृथ्वीवर आणले. ही खरे पहाता महत्त्वपूर्ण घटना या संदर्भात विठ्ठलभक्तीची पताका खांद्यावर मिरविणाऱ्या वारकरी संप्रदायाची भूमिका समजून घेणे महत्त्वाचे ठरते. यातूनच वारकऱ्यांच्या संपूर्ण जीवनमार्गाचे अधिष्ठान समजते, ते सामान्यभक्तांच्या दृष्टीने अनमोल आहे. वारकरी संप्रदायाचा पाया असलेल्या ज्ञानोबा माऊलींच्या कुशीत शिरून आपल्याला या जीवनमार्गाचे अधिष्ठान समजून घेता येते.

तुकोबारायांनी सांगितलेल्या, पुंडलिकाने आणलेल्या या वैकुंठीच्या परब्रह्माचे मूळ रूप संत ज्ञानदेवांना नाथपंथीय गुरुशिष्य परंपरेने प्राप्त झालेल्या अद्वैत तत्त्वज्ञानात दिसते.

परमात्मा नित्यस्फुरद्रूप असतो. ही स्फुरणे (१)सामान्य स्फुरण व (२) विशेष स्फुरण या दोन प्रकारची असतात. परमात्म्याची दोन रुपे (१)विश्वात्मक (२) विश्वोत्तीर्ण या प्रकारची असतात.

हे विश्व त्या परमात्म्याचे शुद्धसात्त्विक स्फुरणच आहे. विश्वातील सर्व पदार्थ विश्वरुप धारण करणाऱ्या परमात्म्याने व्यापून टाकले असल्याने खऱ्या अर्थाने हे जग विविधतेने नटल्याचे जाणवते. परमात्म्याजवळ अभेदरूपाने असणाऱ्या शक्तीचा आविर्भाव चित्, आनंद, इच्छा, ज्ञान आणि क्रिया या पाच प्रकारांनी होतो. चित् हा प्रकाशरूप, तर परमात्मा स्वतः प्रकाशित होतो, आनंदशक्तीने परमात्माही आनंदरूप होतो व स्वतः आनंदाचा अनुभव होतो. इच्छेने युक्त असल्यामुळे तो ज्ञानसंपन्नही असतो. क्रियाशक्ती म्हणजे सर्व आकारात अवतीर्ण होण्याची योग्यता असते.

बीजातून वटवृक्ष तसा परमात्म्यात चराचर विश्व असते. स्वतःच्या शरीरात अव्यक्त रूपात असलेले जगत, व्यक्तरूपात परमात्म्याने प्रकट केले.

प्रकाशरूप परमात्म्याच्या प्रकाशाच्या साह्याने अखिल विश्वाचे प्रकाशन होते. आदितत्त्वभूत, व्यापक व अखंड स्वरूप असलेल्या परमात्म्याचा प्रकाश सामान्य रूपातून जगत्-रूपाने अवतरण प्रकाशमय असे विशेषरूप धारण करतो.

या विश्वाला व्यापून असणारे आपल्या भोवतीचे दगडधोंडे, वृक्ष, वनचरे, सुस्वर आळवणारे पक्षी, निर्भय प्राणीजगत आणि सर्वात वहाणारे एकच रक्त-ही खरे तर सारी आपलीच माणसे, हे सारे रूप त्या वैकुंठीच्या परब्रह्माचे इहलोकीचे दुसरे रूपच. विश्वच दुसरे परब्रह्म होय.

ज्ञानेश्वरीत वैकुंठीचे परब्रह्म पृथ्वीवर ठायी ठायी दिसून येते.

...'मी साकारू होऊनि अवतरें ।।' अध्याय ४-५०

...'ऐसे अव्यक्ताचे होय । व्यक्त विश्व ।।' अध्याय ८-५८

...'आता पै माझेनि येके अंशे । जे हें जग चि व्यापले असे ।।' अध्याय १०-२९३

...ज्ञानेश्वरीत चित्विलासवादी भूमिका आहे.

**अ) तुकोबारायांचे परब्रह्म आणि विश्वब्रह्म**

विश्वब्रह्माची संकल्पना पंढरीच्या वारकऱ्यांत खऱ्या अर्थाने राहिली आहे. विश्वब्रह्माची संकल्पना नाथसंप्रदायाच्या 'शांभव दर्शनांतून', 'ज्ञानेश्वरीच्या' माध्यमातून आल्याचे दिसते. तुकोबाराय हे खरे वारकरी वृत्तीचे. ते वैकुंठीच्या परब्रह्माचा फारसा विचार करत नाहीत; कारण पृथ्वीवरील ब्रह्मात ते खूपच रमलेले आहेत.

*'निरंजनी' आम्ही बांधियेले घर ।*
*निराकारी निरंतर राहिलोंसे ।।*

अशा भावावस्थेत तुकोबाराय क्वचित प्रसंगीच जाताना दिसतात. याचे कारण स्पष्ट करताना ते आपल्या भूमिकेचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे करतात–

*जरी मागों पद इंद्राचे । तरी शाश्वत नाही त्याचे ।।*
*जरी मागों ध्रुव पद । तरी त्यासी तेथील छंद ।।*
*स्वर्गभोग मागो पूर्ण । पुण्य सरल्या मागुती येणे ।।*
*मागो जरी पद वैकुंठे । तें तर येकदेशी करंटे ।।*

मोक्षपदाबाबत म्हणाल तर, 'मोक्षसुखा हाणों लाथा', 'मोक्षपद' तुच्छ केले. एवढे तुकोबाराय निरीच्छ दिसतात. समाजातल्या हठयोगीयांच्या मोक्षाकडे नेणाऱ्या समाधीबाबत 'समाधीचे सुख सांडा ओवाळून' अशी

उदासीन वृत्ती तुकोबारायांची दिसते; तर मोक्षाच्या आधीच्या रिद्धि-सिद्धींबाबतही त्यांची भूमिका अतिशय अलिप्ततेची आहे ती अशी–

*'रिद्धि-सिद्धी' तुझे मुख्य भांडवल ।*
*हें तों आम्हा फोल । तुका म्हणे ।।'*

**ब) तुकोबारायांचे विश्वब्रह्म**

शांभव दर्शनातील वारकरी संप्रदायाने स्विकारलेल्या 'विश्वात्मक ब्रह्माच्या' संकल्पनेने त्यांच्या इहलोकीचा जीवनमार्ग ठरून जातो. विश्वात्मक ब्रह्म संकल्पनेचा विचार करता दोन अंगांनी तो विचार करता येतो.

१) विश्व हे ब्रह्मरूप आहे. जे आपल्या अवती भवती आहे, ही पहिली गोष्ट. यातून 'ब्रह्मरूपी जगताशी आत्मौपम्य' नात्यानें राहावे कसे, यासंदर्भातील अतिउच्च अशा अतीव करुणेचे, प्रीतीचे, सामाजिक नीतीचे भान दिले जाते.

२) आपल्या 'स्व'तच परब्रह्माचा अंश असल्याने त्या परब्रह्माशी 'द्वैत' राखून 'अद्वैत' सुख आपण भोगू शकणार नाही, या भूमिकेतून वारकऱ्यांच्या भक्तिमार्गाची उकल होते.

याठिकाणी 'विश्वात्मक ब्रह्म' म्हणजेच पहिल्या अंगाचा विचार आपण करुया. विश्वात्मक म्हणजे अखिल विश्वाला व्यापून असलेला. तुकोबारायांना त्यांच्या अंभगवाणीत स्फुरलेले विश्वात्मक ब्रह्म आणि त्याचा संदर्भ असा–

१) ... *'अव्यक्त तें आकारलें । रूपा आले गुणवंत'*
... *'अव्यक्ता अलक्षा अपारा आनंदा । निर्गुणा सच्चिदानंदा नारायणा ।।'*
*'रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा ।...'*
*'क्षर अक्षर हे तुमचे विभाग ।।'*
... *'अवघा भरोनि उरलासि । वाणीं रसी रूपी गंधी ।।'*
*'...जेथे तेथे देखे तुझीच पाऊलें । त्रिभुवन संचले विठ्ठला गा ।।'*
*'...तुका म्हणे अणु तुजविण नाही ।'*
*'... आसन शयन भोजन गोविंदे । भरले आनंदे त्रिभुवन ।।'*
*'व्यापलें हे नारायणे । ऐसी गर्जती पुराणें ।।'*
*'...जनीं जनार्दन । संत बोलती वचन ।।'*
*'...भूती भगवंत । हा तो जाणतो संकेत ।'*
*'...सर्वां ठायीं तूचि सर्वही जालासी ।'*
*'...अवघें ब्रह्मरूप रिता नाही ठाव ।'*
*'...अवघाचि भूतीं नारायण ।'*
*'विश्वीं विश्वंभर । बोले वेदांताचें सार ।'*
*'...जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ।।'*

विश्वात व्यापून असलेले, चराचराला व्यापलेले ब्रह्म-परब्रह्म तुकोबारायांना प्रतीत आहे.

हजारो वर्षांपासून समस्त भारतीयांच्या मनावर दृढमूल संस्काररूपी मुद्रा कोरणाऱ्या आद्य शंकराचार्यांच्या मायावादापेक्षा तुकोबारायांसारख्या वारकऱ्यांची भूमिका पूर्णपणे आगळी वेगळी अशी पूर्णतः भिन्न आहे. शंकराचार्य या ब्रह्मरूप जगताला तार्किकदृष्ट्या मिथ्या, गौण व अध्यास मानतात तर संतश्रेष्ठ तुकोबाराय ब्रह्मरूप जगताला सत्य मानतात. त्यालाच अधिक महत्त्व देतात. कारण हा सगुण गुणवंत भगवंत 'वाणी, रसीं, रूपी, गंधी' भरून राहिला आहे. हे तुकोबारायांच्या वरील अवतरणांतून लक्षात येते.

२) आपल्या सभोवतालचे सारे विश्व ब्रह्म आहे. विश्व म्हणजे मूळ ब्रह्मचैतन्यातून जन्मास येणारी त्याची भिन्न रूपे होत. तुकोबारायांचे वारकरी-अधिष्ठान श्रेष्ठ सामाजिक मूल्यांचे भान आणून दिल्यावाचून राहात नाही. जे मानवाच्या सांस्कृतिक, सामाजिक जीवनाला निरंतर घडवित असते.

*'वृक्षवल्ली आम्हां सोयरी वनचरें । पक्षीही सुस्वरे आळविती ।।'*

या निसर्गाशी समरस होण्याच्या भूमिकेपर्यंत तुकोबाराय जाऊ शकतात. 'जग अवघें देव ।' ही उपदेशाची ठेव सर्वांसाठी ठेवून तुकोबाराय निघून गेले.

प्राणीमात्रांत म्हणजे 'भूती भगवंत' - म्हणून सर्वलोकांना-जनांना तुकोबाराय भेटायलाही निघतात. स्त्री-पुरुषांसंदर्भाचे समानतेचे तत्त्व सांगून 'नाही हे भावना नरनारी' अशा परमोच्च समानतेच्या पातळीवरही येतात. सारे विश्व म्हणून विष्णुमय आहे असे मनोमनी पटल्याने, खात्री झाल्याने तुकोबाराय मागणेही असे मागतात की,

*ऐसे भाग्य कई लाहाता होईन ।*
*अवघे देखे जन ब्रह्मरूप ।।*
*मग तया सुखा अंत नाही पार ।*

*आनंदे सागर हेलावती ।।*

विश्वरूपी ब्रह्मात असा परमोच्च व निखळ आनंद मिळत असल्यामुळेच 'न लगे हा लौकिक सोडावा वेव्हार' अशी प्रपंचासंदर्भात ऐहिक निष्ठेनेयुक्त भूमिकाही तुकोबाराय मांडतात.

३) अवघे विश्वच ज्या ब्रह्मरूपाने व्यापून गेले, भरून गेले आहे आणि आपण स्वतः या विश्वाचे एक नाममात्र अंश - हा अंशही मग परब्रह्मरूपच. या आध्यात्मिक जाणिवेने तुकोबाराय परब्रह्माशी असलेले आपले नाते गाऊ लागतात.

*...तुम्ही आम्ही पांडुरंग । भिन्न ऐसे काय सांगा ।।*

*...अवघा देवची जाला पाहीं । भरोनियां अंतर्बाही ।।*

*...देवभक्तपण । तुका म्हणजे नाही भिन्न ।।*

*...तुजचि पासव जालोसें निर्माण ।*
*असावें ते भिन्न कासयानें ।।*

*...तुका म्हणें जीवीं शिव ।।*

तुकोबारायांनी 'आत्मा' आणि विश्वब्रह्माचे प्रस्थापित केलेले नाते म्हणूनच त्यांच्या भक्तीमार्गाला येऊन मिळते.

अशाश्वत व क्षणैक जग

विश्व ब्रह्मरूप व विश्व-ब्रह्माच्या, नात्या संदर्भातले हे चिंतन शाश्वत तत्त्वज्ञान, जरी असले तरी प्रत्यक्षात काय दिसते ?

क्षणभंगुर येथील पसारा, या वास्तवाचे भानही तुकोबारायांना होते. आद्य शंकराचार्यांना विश्वातील पदार्थ मिथ्या वाटतात कारण ते क्षणिक व नश्वर आहेत म्हणून. विश्वातील जीवन असार म्हणूनच ते मिथ्या, सत्ता, वित्त, प्रिती, कीर्ती आदी सर्व गोष्टी मिळूनही माणसाला समाधान मिळत नाही; म्हणून विश्वातील साऱ्या गोष्टी मिथ्या असा त्यांचा रोख आहे.

आद्य शंकराचार्यांच्या या मिथ्यावादाचे सचित्र प्रतिबिंब ज्ञानोबा माऊलींपासून तुकोबारायांपर्यंतच्या संत वाङ्मयात दिसून येते.

... हे उपजे आणि नाशे । (ज्ञाने. अध्याय २-१०५)

...परि मध्यें जे प्रतिभासे । ते निद्रीता स्वप्न जैसे ।। (अध्याय २-३६६)

...हे राहिणींचे जळ । (अध्याय ७-२९)

ज्ञानेश्वरीतील अनेक स्थळे, विश्वाबद्दलचा हा मिथ्यावाद, मायावाद अशा स्वरूपात असारपण दाखवितात.

तुकोबारायांना ही क्षणभंगुरत्वाची जाणीव, मिथ्यावाद, त्यांच्या अभंगवाणीत प्रत्यक्ष अनुभवाला आलेला आहेच.

*...देह तंव भोगाचे आधीन । याचे सुख क्षीण क्षणभंगुर।।*

*...अवघाचि आकार ग्रासियेला काळे ।।*

*...शरिरसंपत्ती मृगजळभान । जाईल नासोन खरें नोहे ।।*

*...सुख नाही कोठे आलिया संसारी । वाया हावभरी होऊ नका ।।*

*...दुःख बांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाही कोठें ।*

*...नको नको मना गुंतू मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ।।*

*...तुका म्हणे नाशिवंत हें सकळ ।*

या विश्वाचे हे क्षणभंगुरत्व, फसवेपण तुकोबाराय ज्ञानोबामाऊलींच्या तोडीच्या दृष्टांतांनी व्यक्त करतात.

*मृगजळ काय करावा उतार । पावावया पारपैलथडी ।।*

*खापराचे होन खेळती लेकुरे । कोणत्या व्यवहारे लाभ हानी ।। मंगळदायके करिती कुमारी । काय त्याची खरी सोयरिक ।।*

*स्वप्नीचे जे सुख दुःख जालें काही । जागृती तो नाही साच भाव ।।*

तुकोबारायांची नैतिकता

विश्व हे असार, संसार हा मायाजाल असल्याने जीवन अर्थपूर्ण करावे यासंदर्भातला विचार वारकरी पंथाने खूपच तळमळीने मांडला आहे.

*'बुडती' हे जन देखवे ना डोळा ।*
*म्हणोनी कळवळा वाटतसे ।।*

असा हा कळवळा तुकोबारायांनी प्रातिनिधिक रुपात वारकऱ्यांच्यावतीने व्यक्त केला आहे. धर्माचे पालन करण्यासाठी 'आम्हा हे कौतुक जगा द्यावी नीत ।' अशी भूमिका तुकोबाराय घेतात कारण 'धर्म रक्षावयासाठी । करणे आटी आम्हांसी ।' अशी त्यांची प्रतिज्ञाच आहे. आणि 'उपदेशी तुका । मेघ-वृष्टीने आइका ।' असे आवाहनही करतात. हा उपदेश करता करता 'अधिकार

तैसा करू उपदेश । साहे ओझे तेचि द्यावे ।' अशी वास्तव अन् वस्तुनिष्ठ भूमिकाही ते घेतात.

ज्ञानोबा माऊलींनी दुसऱ्या अध्यायात सांगितलेली स्थितप्रज्ञाची लक्षणे, दुसऱ्या-तिसऱ्या अध्यायातील निष्काम कर्मयोग, सहाव्या अध्यायातील पातंजलयोगाचे नियंत्रण, बाराव्या अध्यायात वर्णिलेली भक्तांची लक्षणे, तेराव्या अध्यायात ज्ञानलक्षणे, सतराव्या अध्यायात सत्त्व, रज, तमाचा विचार, सोळाव्या अध्यायात दैवी आसुरी संपत्तीचे विवेचन तर अठराव्या अध्यायात सांगितलेले, विश्वात्मक कल्याणासाठी मागितलेले पसायदान हा खऱ्या अर्थाने ज्ञानोबा माऊलींच्या ज्ञानेश्वरीतील मूल्यविचार. हाच मूल्यविचार तुकोबारायांच्या बरोबरच्या सर्व वारकऱ्यांनी आपल्या भजन-संकीर्तनातून खऱ्या अर्थाने उजळल्याचे जाणवते.

स्वतःच्या शरीराच्या जोरावर मनुष्य त्याचे ऐहिक आणि पारलौकिक ईप्सित साध्य करण्याचा प्रयत्न करतो. ईप्सित साध्यतेसाठी 'शरीर' साधन म्हणून वापरतो. तुकोबारायांनी त्यांच्या अभंगात 'आत्म्यासहितचे शरीर' ही संकल्पना स्विकारून या शरीराच्या परस्परविरोधी दोन टोकांचे महात्म्य गायिले आहे.

*...शरिर दुःखाचे कोठार । शरिर रोगाचे भांडार ।।*
*...शरिर दुर्गंधीची थार । नाही अपवित्र शरिरा ऐसे ।।*
*...शरिर उत्तम चांगले । शरिर सुखाचे घोसुले ।।*
*...शरिरे साध्य होय केलें । शरिरें साधलें परब्रह्म ।।*
*...शरिर विटाळाचे आळें । मायामोहपाश जाळे ।।*
*...पतन शरिराच्या मुळें । शरिर काळें व्यापिलें ।।*
*...शरिर सकळ हे शुद्ध । शरिर निधींचा हा निध ।।*
*...शरिरें तुटे भवबंध । वसे मध्ये भागी देव शरीरा ।।*
*...शरिर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणांचा रांधा ।।*
*...शरिरें वसे बहुत बाधा । नाही गुण सुदा एक शरीरीं ।।*

आणि अर्थातच शेवटचे तात्पर्य 'शरिर वोखटे ना चांग ।' असे सांगून 'शरिरा दुःख नेदावा भोग । न द्यावे सुख न करी त्याग । असा शरिरासंदर्भाचा व्यवहारही सांगितला आहे...' शरीराची ही दोन रुपे लक्षात घेऊन एक नीतिमंत्र दिला तोही सूत्ररूपानेच.

*सत्य तोचि धर्म असत्य ते कर्म । आणिक हे वर्म नाहीं दुजें ।।*

*पुण्य ते उपकार पाप ते परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी ।।*

याप्रमाणे ज्ञानोबा माऊलींप्रमाणेच तुकोबारायांनीही सर्वप्रथम काम, क्रोध, अभिमान, अज्ञान, भीती, द्वेष, आसक्ती, मत्सराचा ठायी ठायी धिक्कारच केला आहे.

*...निर्विषय कारण असे तेथे ।*
*... परावृत्ती संगी कामादिकां ।*
*...वासना निमाली समूळ ज्यांची ।*
*...करावी हे शांती वासनेची ।*
*...न करावा द्वेष भूतांचा मत्सर ।*
*...विषयीं विसर पडिला निःशेष ।*
*...अहंकार निंदा हिंसा, नाही कपट बुद्धि ।*
*...कोणाही जीवाचा न घडो मत्सर ।*
*...हित व्हावे तरी दंभ दूरी ठेवा ।*
*...पाप त्याचे नाव न विचारता नीत ।*
*भलतेची उन्मत करी सदा ।*
*...अवगुणांचे हाती । आहे अवघी फजिती ।*

अशा तऱ्हेने तुकोबाराय आसुरी, पाशवी व्यवहाराला नाकारत दैवी सांस्कृतिक संपत्तीची, होकारात्मक शैक्षणिक साधनाही सांगत आहेत. 'धर्माची तू मूर्ती । पाप पुण्य तुझे हाती ।' असे आवाहन करत करत तुकोबाराय धर्मकीर्तनही करतात. 'नाही निर्मळ जीवन । काय करील साबण' या पंक्तीतून नामसंकीर्तनाचे शांत व चिरस्थायी समाधान देणारे साध्यही दाखवितात.

याचकरिता तुकोबारायांनी गीतेतील प्रमुख सूत्र सर्वप्रथम समोर ठेवून मनाचे नियमन सांगितले. सांगितले 'उद्धरेत् आत्मनात्मानम्' या सुत्रानुसारचे नियमन असे–

*...तुका म्हणजे चित्त । शुद्ध करावे हे नीत ।*
*...मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचे कारण ।*
*...बैसोनी निवांत शुद्ध करी चित्त ।*
*...मन हे निश्चल जालें एके ठायीं ।*
*तया उणे काइ निजसुख ।*
*...मन गुंतले तु लया । जाय धांवोनि त्या ठाया ।*
*...मागे परतवी तो बळी । शूर एक भूमंडळी ।।*
*...चित्त शुद्धी सेवा देवाची हे ।*
*...सर्वांग निर्मळ । चित्त जैसे गंगाजळ ।*
*...सकळांच्या पाया माझे दंडवत । आपुलाले चित्त शुद्ध*

*करा ।*

ज्ञानेश्वरीतील दैवी संपत्ती-सत्यवचन, अहिंसा, परोपकार, दया, क्षमा, शुचिता, नम्रता, अनहंकार आदी शीलांगाकडे तुकोबाराय यानंतर वळतात. ही ज्ञानेश्वरीतील दैवी संपत्ती वारकऱ्यांनी जयजयकारिली आणि स्वतःत रूजविण्याचा प्रयत्नही केला.

ज्ञानेश्वरीतील या दैवी संपत्तीचा कटाक्षाने रोख आहे तो मोक्षदात्याकडे. तुकोबाराय मात्र मोक्षाला तुच्छ लेखून ही मूल्ये आणि शीलांगे इहलोकीच्या उदात्त आणि श्रेष्ठ अशा स्वानंदासाठीच आहेत असे प्रतिपादतात.

*...शांति, क्षमा, दया मूर्तिमंत अंगी ।।*

*...तुका म्हणे नाहीं शांती क्षमा दया ।। तोवरी कासयां फुंदा तुम्ही ।*

*...दया तिचे नाव भूतांचे पाळण ।*

*...तुका म्हणे क्षमा सर्वांचे स्वहित ।*

*...शांतीपरतें नाही सुख ।*

*...मुखीं अमृताची वाणी ।*

*...पराविया नारी रखुमाईसमान ।*

*...परस्त्रिया सदा बहिणीमाया ।*

*...मुंगी आणि राव । आम्हा सारखाचि जीव ।*

*...एक एका साह्य करू । अवघे धरू सुपंथ ।*

या ठिकाणी तुकोबारायांचा सदा कर्तव्य अशा स्वयमेव मूल्यांचा व शीलांगाचा रोख पारलौकिक अशा मोक्षाप्रती दिसत नाही. स्वानंद, कृतार्थता आणि कृतकृत्यता यापलिकडे त्यांचे ईप्सित जाणवत नाही.

**वारकऱ्यांची संतसंगती**

वारकरी म्हणजेच आषाढी, कार्तिकी, चैत्री, माघी एकादशीला भीमातीरी वसलेल्या श्रीक्षेत्र पंढरपुरी जाणारे, तेथील परमात्म्याच्या सगुणसाकार रूपाला मिठी घालणारे, शुद्ध, पवित्र अन् पावन आत्मे होत.

वारकऱ्यांना परस्परांचा (एकमेकांचा) सहवास अत्यंत प्रिय अन् ओढही खूप. या आंतरिक शुद्ध सहवासातून वारकऱ्यांची हृदये अधिकच पवित्र अन् शुद्ध बनत असतात. हा संत सहवास नैतिकतेचे एकत्रित स्फुरण करण्यास फलदायी ठरतो, उपयुक्त ठरतो.

तुकोबारायांनी तर या संतसहवासाचे रूप अति स्वानंदाने गाईले आहे. संत सहवासाची नैतिक महानता तुकोबारायांना जाणवल्याचे दिसते—

*''भावे तुका म्हणे सत्संग हा बरा । कुसंग हा फेरा चौऱ्यांशीचा ।।''*

याबाबत तुकोबाराय छातीठोक खात्रीही देतात.

संतांच्या शांत, प्रेमळ, मंगलमय व खऱ्या अर्थाने गुणी तत्त्वांचे वर्णन सर्वप्रथम तुकोबाराय करतात—

*...चंदनाचे हात पायही चंदन ।*

*परिसा नाही हीन कोणी अंग ।।*

*...दीपा नाही पाठी पोटी अंधःकार ।*

*सर्वांगी साखर अवघी गोड ।।*

*...तुका म्हणे तैसे सज्जनापासून ।*

*पाहतां अवगुण मिळेचिना ।।*

*...दया क्षमा शांति । बाण अभंग हे हाती ।।*

*...मृदु सबाह्य नवनीत । तैसे सज्जनांचे चित्त ।।*

शांतवृत्तीच्या मृदू व शीतल असलेल्या या संतमंडळींचे सामर्थ्य मात्र कळीकाळाप्रती दरारायुक्त असेच असते.

*...वीर विठ्ठलाचे गाढे । कळीकाळ पाया पडे ।।*

*...मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदू ऐसे ।।*

*...ऐसे बळ नाही आणिकांचे अंगी । तप तीर्थ जगा दान व्रत ।।*

जगाच्या कल्याणासाठी संतांचे जीवन याप्रकारचे असते. तुकोबारायांनाही याची मनोमन जाणीव झाली होती.

*...जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती ।*

*देह कष्टविती परउपकारे ।।*

*...जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ।।*

*...तोचि साधु ओळखावा । देव तेथेचि जाणावा ।।*

*...तुका म्हणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ।।*

*...पाप ताप दैन्य जाय उठाउठी । जालिया भेटी हरिदासांची ।।*

संतमंडळींचे कार्य परमात्म्याचे कार्य असल्याने जगाच्या कल्याणार्थ झटणाऱ्या संतांना तुकोबाराय परमात्म्याचा दर्जा, स्थान देऊन टाकतात.

*तुका म्हणे त्यांचा जीव तोचि देव ।*

*वैकुंठ तो ठाव वसती ते ।।*

*अवघाचि संसार केला ब्रह्मरूप ।*

*विठ्ठल स्वरूप म्हणोनिया ।।*
*तीर्थी धोंडापाणी । देव रोकडा सज्जनी ।।*

अशा संतमंडळींच्या दर्शनाने तुकोबारायांचे भावपूर्ण स्फुरण त्यांच्या कवित्वाला ही साजेसे असेच आहे.

*धन्य आजिदिन । जाले संतांचे दर्शन ।*
*तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ।*
*संत मारगी चालती । त्यांची लागो मज माती ।*
*तुम्ही संत । माया बाप कृपावंत ।*

तुकोबारायांचे हे भावपूर्ण स्फुरण पुढे आणखीच कृतीशील बनते–

*संतांच्या पादुका घेईन मोचे खांदी ।*
*हाती टाळ दिंडी नाचेन पुढे ।।*
*संतपाऊले साजिरी । गंगा आली आम्हांवरी ।।*
*जेथे पडे रजधुळी । तेथें करावी आंघोळी ।।*
*स्वेतबंद वाराणसी । अवघीं तीर्थे तयापासी ।।*
*तुका म्हणे धन्य जालों । संतसागरी मिळालो ।।*
*पुण्य फळले बहुता दिवसां । भाग्य उदयाचा ठसा ।।*
*जालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ।।*
*आजि फिटले माझें कोडें । भवदुःखाचे साकडे ।।*
*कोंदाटलें पुढे । परब्रह्म सावळें ।।*
*आलिंगने संतांचिया । दिव्य जाली माझी काया ।।*

संतमंडळींच्या सहवासाने होणारा बदलही प्रकर्षाने तुकोबारायांना जाणवल्याचे दिसते.

**तुकोबारायांचा भोंदू संतमंडळींवर वार**

भोंदू, दिखाऊ, पोटभरू, स्वार्थी, दांभिक संतमंडळींवर तुकोबारायांनी रोखठोक शब्दात भीडभाड न ठेवता केलेला वार तुकोबाराय नावाच्या वारकऱ्याने केलेला कळसच म्हणावा लागेल. एवढ्या प्रखरतेने दांभिकतेवर हल्ला करणारा संत 'या सम हाच' !

तुलनेत शांतवृत्तीच्या ज्ञानेश्वर महाराज, शांतिब्रह्म नाथमहाराज व भक्तवत्सल नामदेव महाराज या वारकरी संतमंडळींच्या परंपरेत बसणारे तुकोबाराय हे वारकरी मोठे फटकळ पण वृत्ती चोख आणि रोखठोकही ! ढोंगी साधूंचे ढोंगीपण उघडे करण्यासाठी अभंग करण्याच्या मोहातून तुकोबारायही सुटले नाहीत हेच खरे !

*ऐसे संत जाले कळी । तोंडी तमाखूची नळी ।।*
*स्नान संध्या बुडविली । पुढे भांग वोडवली ।।*
*भांगभूकी हे साधन । पचनी पडे मद्यपान ।।*
*तुका म्हणे अवघे सोंग । तेथे कैचा पांडुरंग ।।*
*ऐसे कैसे झाले भोंदू । कर्म करोनि म्हणति साधू ।।*
*अंगा लावूनिया राख । डोळे झाकुनि करिती पाप ।।*
*दावुनी वैराग्याची कळा । भोगी विषयाचा सोहळा ।।*
*तुका म्हणे सांगो किती । जळो तयाची संगति ।।*
*गाजराची पुंगी । तैसे नवे जाले जोगी ।।*
*काय करोनि पठन । केली अहंता जतन ।।*
*अल्प असे ज्ञान । अंगी ताठा अभिमान ।।*
*तुका म्हणे लंड । त्यांचे हाणोनि फोडा तोंड ।।*

ज्ञानदेव माऊलींच्या ओवी छंदापेक्षा, तुकोबारायांच्या ढोंगी, भोंदू संतांची भंबेरी उडवणाऱ्या अभंग छंदाचे रूप पूर्णतया भिन्न जाणवते. ज्ञानदेव माऊलींच्या ओव्या शुभ्र आकाशातल्या चांदण्यांप्रमाणे शीतल आणि हळुवार गंध पसरवणाऱ्या प्राजक्ताप्रमाणे जाणवतात, तर आपल्या सडेतोड भाषेतून ढोंगींच्या ढोंगीपणावर बोट ठेवता ठेवता 'लंड' अशी शिवी देणारा तुकोबारायांचा अभंग मात्र धाडधाड कोसळणाऱ्या वळवाच्या पावसाप्रमाणे वाटतो. त्याची चालच अशी. भोंदूंच्या श्रीमुखात फटाफट देत तुकोबारायांचा हा फटकाच आहे.

**तुकोबारायांचा भक्तिमार्गात मोक्ष-मुक्तीला नकार**

मोक्षाला आपल्या भारतीय अध्यात्म शास्त्रात शेवटचे ध्येय मानले. त्यातून ज्ञानयोग, निष्काम कर्मयोग, हठयोग, असे विविधमार्ग पुढे आले. हे सर्व आपल्याला घेऊन मोक्षाच्या अंतिम मार्गाकडे मार्गक्रमण करतात. अध्यात्मशास्त्रानेही या संदर्भातील कारणासह मीमांसा स्पष्ट केली आहे. ती येणे प्रमाणे–

मानवी प्रवास जन्मापासून अंतापर्यंत दुःखमय असाच आहे. मानवी जीवाचा संबंध वासनामय शरीराशी असल्याने आपण या दुःखाचे वाटेकरी होतो. मानवी जीवनाच्या अंती म्हणजे मृत्यूनेही सुटका होत नाही. या दुःखासंबंधी त्याचे कारणही तसेच सांगितले आहे, अमर आत्मा मृत्यूनंतरही, दुसऱ्या नव्या तरीही वासनामय शरीरातच प्रवेशतो, यामुळे पूर्वजन्मीच्या संचिताचे दुःख याही जन्मात त्याच्या वाट्याला येते. आत्मा जन्ममृत्यूच्या न संपणाऱ्या फेऱ्यातून पुढेपुढे चालतो; म्हणून त्याला सारेच दुःख वाट्याला येते. इहलोकीच्या न संपणाऱ्या

जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून बाहेर पडणे, सुटका होणे म्हणजे मोक्षप्राप्ती होणे. मोक्षप्राप्ती होणे म्हणजे या सुटकेतून आत्म्याचे परब्रह्माशी तादात्म्य पावणे, एकरूप होणे.

याअर्थाने भक्तिमार्ग हा वारकऱ्यांप्रति जीवनमार्ग होय. या भक्तिमार्गाचे अखेरचे साध्य या इहलोकी भक्तीतून मिळणारा निर्भेळ आत्मिक आनंद हेच आहे. पारलौकिक मोक्ष हे या भक्तिमार्गाचे साध्य नक्कीच नाही. स्वर्ग, इंद्रपद, वैकुंठ तर नाहीच नाही.

वारकऱ्यांना हठयोग्यांचा समाधी मोक्षही नको आहे. ज्यातून कुंडलिनी जागृत करून ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन तेथले अमृत पिता येते. 'अहंब्रह्मास्मि' या अद्वैती अवस्थेत जाणारा ज्ञानयोग्यांचा मोक्षही त्यांना नको, स्वकर्माचा त्याग करून मिळणारा संन्यासयोगही नको, शिवाय सारी स्वकर्मे ब्रह्मार्पण करून मिळणारा कर्मयोग्यांचा मोक्षही वारकरी नाकारतात.

वारकरी निरासक्तच रहाणारे असल्याने आपली सारी कर्मे ते निष्काम कर्मयोग्यांच्या वृत्तीनेच करणार. इहलोकी राहूनच आपली कर्मे ब्रह्मार्पण करूनही ईश्वराशी अद्वैत भक्तिसुख भोगतात आणि म्हणूनच इहलोकी राहून आनंद देणारे निर्भेळ भक्तिसुख त्यांना मोक्षाहूनही श्रेष्ठ वाटते. मोक्षाला तुच्छ लेखण्याची वारकऱ्यांची भूमिका ही अशी-

तुकोबारायही अहोरात्र भक्तीसुखात डुंबल्यामुळेच मोक्षाला तुच्छ लेखतात–

*...मोक्षपद तुच्छ केले या कारणें ।*

*...भक्तीच्या उत्कर्षे । नाही मुक्तीचे ते पिसें ।*

*...विसरले मुक्ती भक्तीच्या अभिलाषे ।*
*ओढत सरिसे सुख आलें ।।*

*मुक्ती मुक्ती फुकाच साठी । कोणी तयाकडे न पाहेरे ।।*

*...भय नाही जन्म घेतां । मोक्षसुखा हाणों लाता ।।*

*नाही मोक्ष मुक्ति चाड । तुझी सेवा लागे गोड ।।*

तुकोबाराय हे मोक्ष अन् मुक्तीबद्दल बोलतात. परलोकी कोठेतरी असलेले वैकुंठ ते तुकोबारायांना हवेसे कसे वाटेल?

*...काय वैकुंठ बापुडे तुझ्या प्रेमसुखापुढें ।*

*...नको वैकुंठीचा वास ।*

तुकोबारायांसारख्या निस्सीम वारकरी भक्ताने परलोकीचे वैकुंठही इहलोकी आणले ते त्यांच्या भक्तिरंगामुळे. आपल्या घरीच वैकुंठनिवासाचे सुख ते अनुभवताना दिसतात.

*...तुका म्हणे घरी आणिले वैकुंठ ।*
*वसविली पेठ वैष्णवांची ।।*

*...तुका म्हणे सोपी केली पायवाट ।*
*पंढरी वैकुंठ भूमीवरी ।।*

*...जाला इहलोकी परलोक आलें सकळीक वैकुंठ ।।*

*आम्ही वैकुंठवासी । आलों याच कारणासी ।।*

*विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां । हा सुख सोहळा स्वर्गी नाही ।।*

*वैकुंठीचे निज । परब्रह्म आणिले ।।*

*...तुका म्हणे पेठ । भूमीवरी हे वैकुंठ ।।*

आणि म्हणूनच हा इहलोक भक्तीमुळे वैकुंठाहूनही श्रेष्ठ ठरला असेच तुकोबाराय या ठिकाणी प्रतिपादितात.

मोक्षाला तुच्छ लेखत तुकोबाराय सर्वांना सुलभ, साधा, सरळ भक्तीमार्ग हाच इहलोकीची आनंद यात्रा असल्याचे सांगून मोक्षप्राप्तीच्या इतर मार्गांनाही कमीच महत्त्व देतात.

*...न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ।।*

*नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितीभाव ।*

*...आनंद अद्वय नित्य निरामय । जे कां निज ध्येय योगियांचे ।।*

*...ते हे समचरण साजिरे विटेवरी । पहा भीमातीरीं विठ्ठलरूप ।।*

*...समाधीचे सुख सांडा ओवाळून । ऐसें हे कीर्तन ब्रह्मरस ।।*

*...जप तप ध्यान न लगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ।।*

*...न लगे सायास जावे वनांतरा । सुखे येतो घरा नारायण ।।*

आधी सांगितल्याप्रमाणे भारतीय अध्यात्मशास्त्राने नाकारलेला दुःखमय इहलोक आणि दुःखाने भरलेला मानवी जन्म तुकोबारायांसारख्या निस्सीम भक्त वारकऱ्याने पांडुरंगाच्या भक्तिसुखासाठी मोठ्या आनंदाने स्वीकारला. भारतीय तत्त्वज्ञान क्षेत्रातील हा कळसच नाही का ?

*...भय नाही जन्म घेता ।*

*...तुका म्हणे बरा जोडला हा देह । मनुष्यपणे*

*इहलोकां आलो ।।*

*...आम्हा भय चिंता नाही धाक । जन्म मरण काही एक ।।*

*...तुका म्हणे येथे सकळ विश्रांती । आठवावा चित्ती नारायण ।।*

*...ब्रह्मादिका शिराणी । तो हा आनंद मेदिनी ।।*

*...मोक्षपद तुच्छ केलें या कारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगी ।।*

तुकोबारायांनी खऱ्या अर्थाने जयजयकार केला तो इहलोकाचा; आणि इहलोकीच्या भक्तीमय मानवी जीवनाचा !

**देवच भक्त, भक्त तोचि देव**

परमात्मा अनंत जीवांना व्यक्त करतो. सूर्यनारायणापासून जसे सहस्ररश्मी निघावेत तसे हे कार्य. अशा या परमात्म्याचा छोटासा, अल्प, स्वल्प अंश म्हणजेच जीव. काय प्रयोजन या जीवाचे ? जीवांना व्यक्त करणाऱ्या परमात्म्यास स्वप्रेमाची प्रचिती देणे हेच प्रयोजन.

स्वप्रीतीस्तव परमात्मा अनेक रूपांनी नटतो. तेव्हा अंगभूत सत्तेचे अंतिम स्वरूप होते प्रेम आणि याच प्रेमाची जीवाने अनुभूती घ्यायची असते आणि द्यायची असते.

ही प्रेमानंदाची अनुभूती विश्वातील इतर पदार्थ घेऊ शकत नाही. कारण फक्त जीवच परमात्म्याचा चिन्मय अंश असल्याने त्याला ही अनुभूती घेता येते आणि म्हणून वारकरीही परमात्म्याच्या प्रेमाच्या अनुभूतीचे द्वार हेच मानवी जीवाचे खरे स्वरूप मानतात.

तसे पाहता अनुभव घेणे हा मानवी जीवाचा स्वभावच. अनुभवाचे अवलंबित्व जीवाच्या इच्छेवर अवलंबून असते. परमात्म्याचा हा अनुभव श्रेष्ठतम अनुभव होय. ही वारकऱ्यांच्या भक्तीमार्गाची याबाबतची भूमिका आहे. यातूनच परमात्म्याला हव्या असलेल्या प्रेमाची प्रचिती वारकरी देऊ शकतात आणि त्याचा अंश असल्याने हे प्रेम भोगतातही.

याठिकाणी तुकोबाराय म्हणतात त्याप्रमाणे ''भक्त तोचि देव । देव तोचि भक्त ।'' अशी अवस्था आहे. हा परमभक्त ही भावस्थिती इहलोकी भोगतच असतो. तुकोबारायही ह्या प्रेमाचे, भावभक्तीचे स्फुरण परमात्म्याशी एकरूप होऊन गातात.

*...नाचती आनंद कल्लोळीं । पवित्र गाणे नामावळी ।।*

*...यारे नाचों अवघेजण । भावें आनंदे करून ।।*

*...जालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदे भार घेतला माझा ।।*

*...डौरलों भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें ।*

*...मन रंगले रंगलें । तुझ्या चरणी स्थिरावले ।।*

*तुकोबाराय म्हणतात अशा समयी मन, बुद्धि व इंद्रिये यांचे या भक्तीसागरात प्रेमाने विरघळणे होत असते.*

*...आनंदले मन । प्रेमें पाझरती लोचन ।।*

*...तुका म्हणें आळी । जेवी नुरेचि वेगळी ।।*

*...निर्मळ चित्ते जालीं नवनीतें । पाषाणा पाझर फुटती रे ।*

भक्तीच्या आनंदरंगात तुकोबाराय परब्रह्माचे सगुणरूप, प्रेममय भक्तीच्या देवाणघेवाणीसाठी 'हृदयांमाजी संचारोनि राहों' असे मागणे मागताहेत.

*सदा माझे डोळां जडो तुझी मूर्ती ।*
*रखुमाईच्या पति सोयरिया ।।*
*गोड तुझे रुप गोड तुझे नाम ।*
*देई मज प्रेम सर्वकाळ ।।*
*विठो माऊलीये हाचि वर देई ।।*
*संचरोनि राही हृदयामाजीं ।।*
*तुका म्हणे काही न मागे आणिक ।*
*तुझे पायीं सर्व सुख आहे ।।*

तुकोबारायांना अनुभूती यायला लागते.

*पांडुरंग मनी पांडुरंग ध्यानीं। जागृती स्वप्नी पांडुरंग ।।*

ही अनुभूती वारकरी तुकोबाराय नावाच्या एकट्या भक्तांचीच नाही, तर ही अनुभूती जीवांना जन्मास घालणाऱ्या त्या परमात्मा परब्रह्माची आहे. हा एकमेकांचा प्रेमव्यवहार तुकोबाराय असा व्यक्त करतात.

*देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ।।*

*भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगे सुख भोगी ।।*

*देवे भक्ता रूप दिलासे आकार । भक्ती त्याचा पार वाखाणिला ।।*

*एका अंगी दोन्ही जाली हीं निर्माण । देवभक्तपण*

*स्वामी सेवा ॥*

*तुका म्हणे येथे नाही भिन्न भाव । भक्त तोचि देव, देव भक्त ॥*

**श्री विठ्ठलाचे अपत्य**

*पैल उभा दाता । करी कर ठेऊनिया ।*

असे परब्रह्माचे रुप तुकोबारायांना 'दाता' या स्वरुपात दिसते, तर कधी–

*सर्व भावें पति ध्यानीं मनी ।*

असे पतिव्रतेच्या मनातील सखत्वाचे नातेही विकसित होताना दिसते. तरीही खऱ्या अर्थाने तुकोबारायही नामदेवांप्रमाणेच परमात्मा श्री विठ्ठलाचे अपत्य आहे. *'समर्थांचे बाळ पांघरे वाकळ । हसती सकळ लोक कोण ॥'* अशी उपहासात्मक थोडीशी खोडी काढली असली तरी खऱ्या अर्थाने भक्तीप्रमाणे ओथंबलेली वारकऱ्यांची वत्सलता त्यांच्या त्या कन्येच्या रुपात दिसते–

*कन्या सासुऱ्यासि जाये । मागें परतोनी पाहे ॥*

*तैसें जाले माझ्याजीवा । केंव्हा भेटसी केशवा ॥*

*चुकलीया माये । बाळ हुर हुर पाहे ॥*

*जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥*

सासरला प्रस्थान करणारी पण जाताना परतून मागे पहाणारी तुकोबारायांची मनरूपी कन्या सासरी गेल्यावर माहेरच्या भेटीसाठी आतुरणार नाही का ? तगमगणार नाही का ?

*जातिया निरोप पाठवी माहेरा । का मज सासुरा सांडियेलें ।*

*पैल कोण दिसे गरुडाचे वारिकें । विठ्ठलासारिखे चतुर्भूज ॥*

*तुका म्हणे धीर नाही माझ्या जीवा । भेटसी केधवां पांडुरंगा ॥*

असा माहेरचा निरोप संतांच्या हाती येताच सुखाची आत्मानुभूती आलेली तुकोबारायांची भक्तवत्सल मनाची सासुरवाशीण माहेरी जाण्यासाठी उतावीळ होते.

*आपुल्या माहेरा जाईन मी आता । निरोप या संतां हाती आला ॥*

*सुखदुःख माझे ऐकले कानीं । कळवळा मनी करुणेचा ॥*

*करुनि सिद्ध मूळ साऊले भातुके । येती दिसे एकें न्यावयासी ॥*

*त्याचि पंथे माझे लागलेसे चित्त । वाट पाहे नित्य माहेराची ॥*

*तुका म्हणे आता येतील न्यावया । अंगे आपुलिया मायबाप ॥*

**सगुण साक्षात्कारी भक्ती**

तुकोबारायांच्या निर्गुण निराकार परब्रह्माला सगुण रुप घ्यावे लागले. भावभक्तीचा मार्ग सामान्यांच्या जवळ आवाक्यात आणण्यासाठी तुकोबारायांना हा भक्तीपंथ सोपा करणे आवश्यक वाटले.

भक्त पुंडलिकाने भीमातीरी श्रीक्षेत्र पंढरपुरी, आणलेल्या त्या परब्रह्माला 'राजस सुकुमार घननीळ सुंदर ध्यान, या प्रकारचे पंचसंवेदनांना' भिडणारे रुप दिले.

वारकरी संप्रदायाचे हे सर्वांना सुखाची आत्मानुभूती देणारे कोवळे रूप तुकोबारायांनी जनमानसाच्या ठायी ठायी कोरून ठेवले.

*सुंदर ते ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ॥*

*तुळसीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर तेचि ध्यान ॥*

*मकरकुंडले तळपती श्रवणीं । कंठी कौस्तुभमणि विराजित ॥*

*तुका म्हणे माझे हेचिं सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥*

पुंडलिकाकरवी भीमातीरी अवतरलेले ते पंढरपुरीचे विठ्ठल भक्तवत्सल वारकऱ्यांचे आणि त्यांच्या संप्रदायाचे दैवतच, वारकऱ्यांच्या निस्सीम भक्तीला हे विठ्ठलरूपी चैतन्याचे सगुण रूप प्रेमसुख देणारे आहे.

*विठ्ठल प्रेमाचा पुतळा । विठ्ठल मायबाप चुलता ।*

*विठ्ठल भगिनी आणि भ्राता । विठ्ठल जीवीचा जिव्हाळा ।*

असा कृपावंत कृपाळू परमात्मा विठ्ठल प्रेममय जिव्हाळा देतो. आपल्या अभंगातून तुकोबारायांनी विठ्ठलाचा, परमात्मा पांडुरंगाचा पुन्हा पुन्हा जयजयकार केला आहे. विठ्ठलाच्या, पांडुरंग परमात्म्याच्या सगुण रूपातून त्यांच्या मूळ रुपाचे सुखमय प्रेम स्वतः घेतले अन् अभंगातून दिलेही.

**माहेर संतांचे**

भक्तवत्सल वारकऱ्यांचे परमात्मा विठ्ठल तोच सखा पांडुरंग आराध्य दैवत. हा वारकरी आषाढी-कार्तिक

एकादशीला पंढरपुरी म्हणजेच माहेराला जातो. वारकऱ्यांच्या शेकडो वाऱ्या होतात, त्या प्रेमसुख प्राप्तीसाठी. वारकऱ्यांच्या उपस्थितीत विठ्ठल गजराने पंढरपूर दुमदुमून जाते.तुकोबारायांच्या अभंगातही अशीच पंढरी आहे.

*तीर्थांचे मूळ व्रतांचे जें फळ । ब्रह्म ते केवळ पंढरीचे ।।*

केवळ वारकऱ्यांचे नव्हे तर तुकोबारायांचेही वैकुंठ म्हणजेच पंढरपुरीचे माहात्म्य, तुकोबारायांनी आपल्या गाथेत गाईलेले आहे. या पंढरपूर महात्म्याचा गौरवाचा सारांश येणेप्रमाणे–

*भीमतीरीं एक वसविलें नगर त्याचे नाव पंढरपूर रे ।।*
*तेथील मोकासी चार भुजा त्यांसी । बाईल सोळा हजार रे ।।*
*नाचत जाऊ त्याच्या गावा रे खेळीया । सुख देईल विसावा रे ।।*
*...संत सज्जनीं मांडिली दुकानें । जया जे पाहिजे ते आहे रे ।।*
*भुक्तिमुक्ती फुकाचसाठीं कोणी तयाकडे न पाहे रे ।।*
*न वजो म्हणती आम्ही वैकुंठा । जीहीं देखिली पंढरी रे।।*
*अवघीच पापें गेली दिगांतरी । वैकुंठ पंढरी देखलिया।।*

तुकोबाराय येणेप्रमाणे पंढरीचे महात्म्य गातात.

**भजन : कीर्तन गजर**

*'सोपे वर्म आम्हां सांगितले संतीं । टाळ मृदुंग हाती घेऊन नाचा ।।'*

देहू-आळंदी अन् पंढरपुरी जाणाऱ्या वारकऱ्यांच्या दिंडीसोहळ्यात वर्षानुवर्षे विठू नामाचा गजर चालतो आहे. भांवविश्व या नामसंकीर्तनाने पावन होऊन जाते. सद्गुरू बाबजींनी 'रामकृष्ण हरि' हा नाममंत्र तुकोबारायांना स्वप्नात दिला होता. हाच मंत्र आयुष्यभर गाऊन आपले जीवन तुकोबारायांनी धन्य केले.

*...रामकृष्ण हरि विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्व काळ ।।*
*...तुका म्हणे मज अवघे तुझे नाम । धूप दीप रामकृष्ण हरि ।।*
*...देह पडो चिंतनी । विठ्ठल नामसंकीर्तनी ।।*

या रामकृष्णहरि मंत्राचे सामर्थ्यही तुकोबारायांनी वर्णिलेले आहे.

*नाम घेता मन निवे । जिव्हे अमृतचि स्रवे ।।*
*तुका म्हणे नामापाशीं चारी मुक्ति । ऐसें बहु ग्रंथी बोलियेले ।।*
*नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरींची ।।*

नामसंकीर्तनाचे महत्त्व ध्यानात घेऊनच 'हरिनामवेली'वरच्या आपल्या काव्यात्मरुपकात तुकोबाराय नामसंकीर्तनाच्या भक्तीमय आनंदसागरात न्हाऊन निघतात.

*हरिनामवेली पावली विस्तार । फळीं पुष्पी भार वोल्हावली ।।*
*तेथे माझ्या मना होई पक्षीराज । साधावया काज तृप्तीचें या ।।*

भावभक्तीच्या नीरव शांततेच्या पंढरपुरी, चंद्रभागातीरी वाळवंटी परमात्म्याचे हे परमभक्त वारकरी आषाढी-कार्तिकीच्या भजनसंकीर्तनात न्हाऊन निघताना आपल्या प्रापंचिक सुखदुःखांना बुडवून टाकतात.

सातत्याने होत राहणारा विठ्ठलनामाचा जयघोष ते इतक्या तन्मयतेने भक्तिभावाने करतात की सारे वारकरी ह्या नामघोषाशी तादात्म्य पावतात. विठ्ठलाच्या पांडुरंग

परमात्म्याच्या भक्तिमय आनंदसागरात खऱ्या अर्थाने न्हाऊन निघतात.

तुकोबारायांनी विठूनामाचा वारकऱ्यांकडून होणारा जयघोष, होणारी भक्तिमय आनंदक्रीडा अतिशय धावत्या पण तितक्याच संगीतमय शब्दांत वर्णन केली आहे.

*खेळ मांडियेला वाळवंटी घाई । नाचती वैष्णव भाई रे ।।*

*क्रोध अभिमान केला पावटणी । एक एका लागतील पायी रे ।।*

*नाचती आनंदकल्लोळी । पवित्र गाणे नामावळी ।।*

*गोपीचंदन उटी तुळशीच्या माळा । हार मिरवीती गळा रे।।*

*टाळ मृदुंग घाली पुष्पांचा वर्षाव । अनुपम्य सुखसोहळा रे ।*

*वर्ण अभिमान विसरली याती । एक एका लोटांगणी जाती रे ।।*

**सामाजिक समतेचा संदेश**

गेली हजारो वर्षे साऱ्या जातीधर्माचे वारकरी एकमेकांच्या हातात हात घालून पंढरीची वाट चालत आहेत. त्यामुळेच समतेचा, बंधुत्वाचा, सामाजिक परंतु नैतिकतेवर आधारीत चिद्‌विलासाचा सिद्धांत साऱ्यांनीच स्वीकारला. मनोमन मानला. भक्तीच्या वाटेवर सारे सारे विलोभनीय, आध्यात्मिक आणि सांस्कृतिक, सामाजिक क्षेत्रातले हे विहंगम पण उल्हासित करणारे दृश्य नामदेवरायांपासून आजवर सारेच वारकरी अनुभवीत आले आहेत.

*...भक्ति गा येथ सरे । जाती अप्रमाण ।*

*...म्हणोनि कुळ जातीवर्ण । हे आघवेचि अकारण ।।*

*...यापरी पापयोनीही अर्जुना । वैश्य शुद्र अंगना ।*

*...मातें भजता सदना । माझीया येती ।।*

ज्ञानोबा माऊलीही भक्तीमार्गात जात, कुळ, वर्गाला महत्त्व न देता शूद्रांना परमात्म्याच्या घरात प्रवेश देतात.

*...याती शुद्र वैश्य केला वेवसाय ।*

*...बरा कुणबी केलों ।*

*...याती मतिहीन रुपे लीन दीन ।*

स्वतः तुकोबाराय वारकरी असल्याने, वारकऱ्यांतच वावरत असल्याने, वारकरी संप्रदायाची समता बंधुता अंगी बाणली असल्याने याबाबत कधी आव्हानात्मक तर कधी धिक्काररुपी भाषा करताना दिसतात.

*...उकीरड्यावरती वाढली तुळसी । टाकावी ते कैसी ठाया गुणें ।।*

*...उभी कामधेनू मांगाचे अंगणी । तिसी काय ब्राह्मणी वंदू नये ।।*

*...यातिहीन जाला गावीचा मोकासी । त्याच्या वचनासी मानू नये ? ।।*

*...भावारुढ तुका मुद्रा विठोबाची । न मनी तयांची तोंडे काळी ।।*

अशा आव्हानात्मक व धिक्काररुपी भाषेनंतरही तुकोबाराय जन्मवर्णापेक्षा गुणाधिष्ठीत वर्णाचाही पुरस्कार करताना दिसतात.

*...आसुरी स्वभाव निर्दय अंतर । मानसीं निष्ठुर अतिवादी ।।*

*...यातिकुळ येथे असे अपप्रइमाण । गुणाचे कारण असे अंगी ।।*

*...उत्तमकुळी, जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कुळ उभयतां ।।*

येणेप्रमाणे तुकोबाराय गुणाधिष्ठत वर्णाचे महत्त्व सांगतात. हे सांगताना स्वतःच्या भक्तिमय वारकरी संप्रदायाने स्वीकारलेला न्याय्य सामाजिक समतेचा पुरस्कार करतात–

*...याती कुळ येथे असे अप्रमाण । गुणाचे कारण असे अंगी ।।*

*...सकळांसी येथे आहे अधिकार । कलियुगी उद्धार हरिनामें ।।*

*...तुका म्हणे वर्म धर्म । अवघें आहे सम ब्रह्म ।।*

*...गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातिशी कारण नाही देवा ।।*

*...नाही कर्म धर्म जाती । नामी अवधींचि सरती ।।*

तुकोबारायांनी सामाजिक समतेचा जयजयकार या प्रकारे केला. आठशे वर्षे या वारकऱ्यांनी भीमातीरीच्या वाळवंटात मांडलेल्या विठूनामा जयघोषाच्या खेळातील हे अतिशय पवित्र, मंगल अन्‌ विलोभनीय दृश्य तुकोबारायांनी प्रत्यक्षच पाहिले होते.

*वर्णाभिमान विसरले याति । एक एका लोटांगणी जाती रे ।।*

**परब्रह्म प्रकाश**

वारकरी संप्रदायाने स्वीकारलेला भक्तिमय चिद्‌विलासाचा सिद्धांत सामान्य माणसाच्या अंतःकरणात त्या निर्माणकर्त्या परब्रह्माचे स्फुल्लिंग फुलविते आणि हेच स्फुल्लिंग परब्रह्माच्या प्रकाशरुपात प्रकट होते. असा हा परब्रह्माचा प्रकाश भक्तिमय चिद्‌विलासात न्हालेल्या भक्तालाही अनुभवता येतो. यातूनच आपला जीव तो अणुएवढा तो आता परब्रह्माएवढा म्हणजेच आकाशाएवढा झाल्याचा अनुभवच नव्हे तर साक्षात्कारही भक्त घेऊ शकतो.

संतश्रेष्ठ तुकोबारायांसारख्यांना परब्रह्माचा साक्षात्कार, 'आम्हा घरी धन शब्दांचीच रत्ने' असे म्हणणाऱ्या तुकोबारायांच्या घरी 'शब्दांचीच रत्ने असल्याने' आपण सर्वजण खऱ्या अर्थाने आश्चर्यचकित होऊ अशा काव्यात्मवाणीत टिपला तो असा–

*...अंतरीची ज्योती प्रकाशली दीप्ती । मुळींची जी होती आच्छादिली ॥*

*...तेथीचा आनंद ब्रह्मांडी न माये । उपमेशी काय देऊं सुखा ॥*

*...अहं सोहं ब्रह्म आकळलें ।*

*...लवण मेळवतां जळे । काय उरले निराळें ॥*

*...तैसा समरस जालों । तुजमाजी हरपलों ॥*

*...आपुले मरण पाहिलें म्या डोळां ।*

*...अणुरेणुया थोकडा । तुका आकाशाएवढा ॥*

*...धवळले जगदाकार । अंधार तो निरसला ॥*

असे हे तुकोबाराय वारकरी संप्रदायातले शेवटचे साक्षात्कारी संत अन् कळसही ! त्यांच्याच साक्षात्कारी भक्तीरसाने ओथंबलेले अभंगवाणीतील ही ओळ–

*आनंदाचे डोहीं आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचे ॥*

**जनमानसाला संस्कार**

वारकरी संप्रदायातील सर्वच संतांनी समाज स्थितीवर लक्ष ठेवून 'समाज प्रबोधना'चे कार्य पार पाडले. संतांच्या या कार्यावर लिहिणाऱ्यांनी आजही कालसापेक्ष राहूनच लिहिले पाहिजे आणि म्हणूनच तुकोबारायांइतक्या तळमळीने, कळकळीने समाजाच्या उत्थानाला आवश्यक अशा शाश्वत नीतिमूल्यांचा पुरस्कार व पाठपुरावा फारच थोड्या संतमंडळींनी केला असेल असे म्हणण्याला वाव आहे.

खेडोपाडी हरिनामाचे संकीर्तनात रमणारा सामान्य मनुष्यही खऱ्या अर्थाने वारकरीच. अशा एकविसाव्या शतकात प्रवेशलेल्या विज्ञाननिष्ठ शतकात, त्याने तुकोबारायांपासून आणखी कशाची अपेक्षा धरावी ?

भक्तीचे जे नानाविध प्रकार आहेत त्याचा आनंद घेऊन, अवतरित झालेल्या परमात्म्याची म्हणजेच भूतप्राणीमात्राबद्दलची भक्ती-प्रीतीच महत्त्वाची. शिवाय आपल्या स्वतःतील परमात्म्याची म्हणजेच आपल्यातील नैतिकमूल्यांची भक्ती-प्रीतीही तितकीच अधिक्याने महत्त्वाची. आपल्या अवती भवतीचे जगही परमात्म्यानेच व्यावृत असल्याने जगातील सर्वांशी देवत्वाचे नाते दृढ करणे ही आधुनिक भक्तीची पायवाट ठरू शकते.

सामान्य वारकरी जो श्रद्धाळू, भाबडा, भोळा अन् निरागसही. हाच वारकऱ्यांचा भक्तिमार्ग इतर सामान्य श्रद्धाळू जनांना जगातील सत् तत्त्वाचे वेड लावू शकेल हे निश्चित !

**संदर्भग्रंथ**

१) वारकरी संप्रदाय - उदय व विकास - लेखक - भा. प. बहिरट व प. ज्ञा. भालेराव, व्हीनस प्रकाशन, पुणे ३०, प्रथमावृत्ती - १९७२
२) अभंगवाणी प्रसिद्ध तुक्याची - लेखक प्रा. गं. बा. सरदार, प्रथमावृत्ती - १९६२
३) तुका झालासे कळस तुकारामाचे देहु - लेखक - डॉ. रा. चिं. ढेरे, प्रथमावृत्ती - १९५८
४) भक्तीपंथ - नवचिंतन - लेखक - डॉ. हे. वि. इनामदार, प्रथमावृत्ती - १९७७
५) भारतीय तत्त्वज्ञान वैचारिक आणि सामाजिक संघर्ष - लेखक - एस. जी. सरदेसाई, द्वितीयावृत्ती - १९७८
६) गीता प्रवचने - लेखक - विनोबा भावे - प्रथमावृत्ती - १९५९
७) देहुकर सांप्रदायिक ओळीची गाथा - प्रकाशक - ह.भ.प. आचार्य रामकृष्ण महाराज लहवितकर, प्रथमावृत्ती - २००१

❖❖❖

**रामकृष्ण गवळीराम गायकवाड**
य.च.म. मुक्तविद्यापीठ, नाशिक, मु.पो. लहवित, ता. जि. नाशिक. भ्रमणभाष - ९८२२३३९१३०





अनुक्रमणिका

# अंक क्र. ३२१-३२२ एक खुलासा

डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या धीरगंभीर व्यक्तिमत्त्वातील खेळकर, मिष्कील पैलू दर्शविणाऱ्या 'विकटकवी जोगळेकर' या लेखाविषयी दोन पत्रे-आणि काहीजणांनी दूरभाषेने मा. कार्याध्यक्ष आणि मा. प्रमुख कार्यवाह यांच्याकडे नाराजी व्यक्त केली आहे. 'विकटकवी' या शब्दावर त्यांनी आक्षेप घेतला असावा, असे वाटते. कारण सदर लेख आवडला नाही, त्यात डॉ. जोगळेकरांच्या व्यक्तिमत्त्वाला कमीपणा आला, अशा अर्थाचा तो आक्षेप आहे. हा गृहीतार्थ झाला.

'विकट' या विशेषणाचा शब्दकोशातील एका दृष्टीचा जो शब्दशः अर्थ घेतला आहे, तो यात अभिप्रेत नाही.

दक्षिणचा ब्रिरबल म्हणून इतिहासात ओळखल्या गेलेल्या, विजयनगरचा राजा कृष्णदेवराय याच्या पदरी असलेल्या, तेनालीरामाशी याचा संबंध आहे. बाल तेनालीरामाने अमावास्येच्या रात्री कालीमातेच्या मंदिरात तीन कोटीचा जप करून कालीमातेला प्रसन्न करून घेतले. तिचे अक्राळविक्राळ सहस्त्रवदने असलेले रूप पाहून तेनालीराम भयभीत न होता, पोट धरून हसू लागला. 'माताजी आपल्या सहस्त्रनाकांना पडसे आल्यावर आपले काय होत असेल ?' असा प्रश्न विचारणाऱ्या तेनालीरामावर प्रसन्न होऊन कालीमातेने त्यास– 'विकटकवी' म्हणून तुझी लोकात ख्याती होईल.' असा वर दिला. त्यावर 'वाः ! माताजी वात्रट मुलांनी माझे नाव उलटसुलट कसेही वाचले तरी सारखेच राहणार– हा मोठा वरच म्हणायचा !' तेनालीरामाचे हे समयसूचक उत्तर ऐकून देवी अधिकच संतुष्ट झाली व त्याच्याकडे कृपादृष्टीने पहात अंतर्धान पावली.

ही कथा माझ्या मनात होती. तोच संदर्भ 'विकटकवी' या विशेषणाचा आहे. हे छोटेसे पुस्तक माझ्याकडे आहे. त्याचा तपशील पुढीलप्रमाणे–

**Indian Boy-Scouts Series-III**
[CAMP-FIRE STORIES]
बालवीर ग्रंथमाला-३
**चातुर्य-विनोद**
लेखक - अनंत विठ्ठल आपटे, बी.ए., एस्.टी.सी.डी.
स्काउटमास्तर, श्रीहनुमान पथक, पुणे आणि शिक्षक,
ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, पुणे.
प्रकाशक
**नारायण विठ्ठल आपटे**
व्यवस्थापक, आपटे आणि मंडळी,
५५२ नारायण पेठ, पुणे
१९२५
किंमत पाच आणे
मुद्रक - गोपाळ बळवंत जोशी,
आनंद छापखाना, सदाशिव पेठ, पुणे

जिज्ञासूंना पहावयास मिळेल. 'विकट' म्हणजे विशाल, मोठे, उत्कट असाही अर्थ आहे. शेवटी, अर्थ हा संदर्भाने घ्यायचा असतो. माझ्या मनात हाच संदर्भ आहे. कारण डॉ. जोगळेकर हे माझे १९६३ पासूनचे मित्र होते.

–सु. कुलकर्णी
संपादक






अनुक्रमणिका

# संत कबीर आणि संत तुकारामांचे आध्यात्मिक तत्त्वज्ञान



□ प्रा. डॉ. संजय संभाजी लांडगे

संत कबीर यांची भक्ती सजग आणि डोळस होती. ईश्वर हाच त्यांच्या भक्तीचे केंद्रस्थान होता. या भक्तीचे स्वरूप अत्यंत विशाल, उदात्त आणि अनंत अशा उच्चकोटीचे आहे. संत कबीराच्या पदातून आपणाला त्यांचे आध्यात्मिक तत्त्व-निरूपण समजू शकते. एकेश्वरवाद, विशिष्टाद्वैतवाद, द्वैताद्वत, विलक्षणवाद इत्यादी परस्परविरोधी मताचे समर्थन होऊ शकते. हीच कबीरांच्या ठायी असणाऱ्या भक्तीची ओळख आहे. या परस्परविरोधी मतांची अस्थिरता कबीरांच्या विचारात नसून ती त्यांच्याकडे, त्यांच्या कवितेकडे पाहणाऱ्या माणसांच्या वृत्तीत आहे. कबीरांनी तर ईश्वराला सर्वश्रेष्ठ मानले आहे. कारण ईश्वर हाच सृष्टीकर्ता आहे. तो सर्वव्यापी, जळी-स्थळी, काष्ठी-पाषाणी चराचरात भरून राहिला आहे. तो निर्गुण निराकार आहे. सगुण साकार आहे. लौकिक दृष्टीतून ज्या गोष्टी परस्पर विरोधी दिसतात त्या सर्वच अलौकिक ईश्वरस्वरूपात सामावून जातात. एकरूप होतात. ही गोष्ट या जगातील भक्ती स्वरूपी दुनियेत नवीन नाही. कारण भक्त देवाची भक्ती विविध मार्गांनी करतात. ते परस्पर विरोधीही असू शकतात. परंतु ते सर्व मार्गांनी येऊन परमेश्वरालाच मिळतात. मग तो मार्ग निर्गुणनिराकार भक्तीचा असो अथवा सगुण-साकार भक्तीचा असो. संत कबीरांची भक्ती ही निर्गुण-निराकार स्वरुपात आहे. ती त्यांच्या कवितेद्वारे आपणाला समजून येऊ शकेल. 'कबीर ने प्रधान रूप से निर्गुण ब्रह्म का ही अपनी रचनाओं में बयान किया है ।[१] हे खरे आहे. त्यांनी उपनिषदाच्या पद्धतीप्रमाणे, त्याचबरोबर साधक आणि योगीयांच्या शून्यवाद, सहजवादीयांचा सहज ब्रह्मवाद, इस्लामचा एकेश्वरवाद आणि सूफी यांच्या प्रेमाच्या आधारे आपला विचार मांडला आहे.

संत तुकाराम यांची भक्ती सगुण साकार स्वरुपात आहे. ही भक्ती सजग आणि डोळस आहे. मुक्तीपेक्षाही तुकारामांनी भक्ती श्रेष्ठ मानली आहे. तुकोबा विठ्ठलाचे परमभक्त होते परंतु त्याच्या सर्वव्यापकत्वावरून त्यांचे लक्ष ढळले नव्हते. विठ्ठलाची मूर्ती म्हणजेच विठ्ठल ही त्यांची भावना नव्हती. कारण त्यांची भक्ती ज्ञानपूर्वक होती. विश्वात सर्वत्र ईश्वर व्यापून राहिल्यामुळे त्याच्यापेक्षा मी भिन्न नाही अशी त्यांची भावना होती.

*न करी रे संग राहे रे निश्चळ । लागो नेदी मळ ममतेचा ।*
*या नावे अद्वैत खरे ब्रह्मज्ञान । अनुभवा वाचून बडबड ते ।*
*इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाही न ये वरी मन ।*
*तुका म्हणे न ये जाणीव अंतरा । अंतरी या थारा आनंदाचा ।।११२ ।।*

तुकोबाची अद्वैत ब्रह्मज्ञानाची अनुभूतीच या अभंगात प्रकट झाली आहे, तर कबीरांना -' कबीर को इस भक्तीमे ज्ञान - पुस्तकी ज्ञान का कोई महत्त्व नाही क्योंकि, उनका विश्वास है कि ईश्वर मे अटूट लय ही मुक्ति के लिए पर्याप्त है, ज्ञान तो संसार की गुत्थी में उलझा देता है । भक्त के लिए इतना ही ज्ञान पर्याप्त है कि वह विषय वासनाओंसे मुक्त हो ईश्वर भजन करे ।[२]

मन विषयाकडे न जाता निश्चल रहा. अहंमय वृत्ती उठू



अनुक्रमणिका

देऊ नकोस अशा वृत्तीरहित अविचलित शांत अवस्थेत निर्गुण परब्रह्म तेवढे असते. या अनुभवावाचून केले जाणारे अद्वैत विवेचन केवळ पोकळ बडबड आहे. इंद्रीय स्वाधीन होऊन वासनांचा क्षय झाला. मनावर वृत्तींच्या लहरी उठेनाशा झाल्या एवढेच नव्हेतर ब्रह्मज्ञान होत आहे अशी जाणीवही राहिली नाही. म्हणजे जी अंतरीची आनंदमय अवस्था असते तोच ब्रह्मज्ञानाचा ब्रह्मानंद होय. त्यावेळी ज्ञाता-ज्ञेय-ज्ञान ही जाणिवेला अवश्य असणारी त्रिपुटी नाहीशी होते आणि द्वैतरहित शांत, निर्विषय आनंदमय ज्ञानस्वरूप परब्रह्म तेवढे शिल्लक राहते. असा जो निर्गुणनिराकार परब्रह्म परमात्मा तो आम्ही भक्तांनी साकार केला आहे.

*रूप नाही रेखा जयासि आकार । आम्ही तो साकार भक्ती केला ।।(२६१)*

*अव्यक्ता अलक्षा अपारा अनंता । निर्गुणा सच्चिदा नारायण ।*

*रूपे नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणे ।*

*तुका म्हणे जरी दाविसी आपणा । तरीच नारायणा कळो येसी ।।७००।।*

नारायण हा वस्तुता अव्यक्त, अलक्ष अपार, अनंत निर्गुण सच्चित् स्वरूप आहे. भक्ताचा भाव जसा असेल त्याप्रमाणे तो स्वेच्छेने रूप नाम धारण करतो. नारायण भक्तांच्या कृपेने आपणाला नामरूपात दाखवील तरच भक्तांना त्यांचे ज्ञान होईल. ज्याला अंत नाही वर्ण, कुळ, याती, हस्तमस्तक अवयव नाहीत असे निष्क्रीय निर्गुण परब्रह्म भक्तांच्या सुखाकरिता सक्रिय व साकार होत असते ते परब्रह्म होय. परमात्म स्वरूपाचे ज्ञान तुकोबांना भक्तिमार्गाने झाले होते. तुकारामांची भक्ती निस्सिम निराकार आहे. तसे त्यांचे वागणे व बोलणेही रोखठोक, खडे आहे. ''नीती म्हणजेच भक्ती अशी त्यांची धारणा आहे. याला त्यांच्या अभंगातून हवी तेवढी बिनतोड प्रमाणे सापडतील. जपतप, यज्ञयाग, ध्यानधारणा, व्रतवैकल्य, भजनपूजन यापेक्षा भावशुद्धी, संयम, सत्यनिष्ठा, सदाचार, भूतदया, समबुद्धी, परोपकार यातच खरी ईश्वरोपासना आहे. हे तत्त्व त्यांच्या विचारप्रणालीत सर्वत्र अनुस्यूत आहे. यात मुळीच शंका नाही.''[३] 'भूतदया ज्याचे मनी। त्याचे घरी चक्रपाणी', 'तोचि देव भक्त। भेदाभेद नाही ज्यात।', 'खरे बोले तरी । फुकासाठी जोडे हरी' अशा आशयाची कितीतरी वचने तुकारामांच्या साहित्यात इतस्ततः विखुरलेली आहेत. ईश्वर हा सर्वव्यापी, जळीस्थळी, काष्ठीपाषाणी आहे. तो निर्गुण निराकार आणि सगुणसाकार अशा स्वरुपात आहे. ही तुकारामांची विचारसरणी महत्त्वपूर्ण वाटते.

कबीरांची आध्यात्मिक सुधा आणि आकांक्षा विश्वव्यापी आहे. त्यांच्या विचारधारेत हिंदू, मुसलमान, सुफी, वैष्णव, योगी अशा सर्वच साधना आणि विचारांचा प्रभाव दिसून येतो. विशेषतः पुराणांच्या अभ्यासातून स्पष्टच माहिती मिळते की, ऋषीमुनींच्या मनात ब्रह्म दोन स्वरुपात होते. एक गुण- विशेष आकार आणि नामाच्या आधारे परब्रह्म तर दुसरे निर्गुण निराकार, निर्विशेष आणि निरूप आणि दुसरे ह्या सर्वच गोष्टींनी व्यापलेले सगुण साकार स्वरुप, पहिले परब्रह्म आणि दुसरे अपरब्रह्म होय याविषयी यज्ञदत्त म्हणतात, 'इन दोनों ब्रह्म का ज्ञान परा विद्या और अपरा विद्या से प्राप्त होता है । इन्ही दोनों ब्रह्म के स्वरुपों को निर्गुण और सगुण ब्रह्म कहा गया हैं । कबीरदासजीने दोनों काही एकीकरण अपने साहित्य में किया हैं ।'[४]

कबीरांनी सुद्धा निर्गुण निराकार व सगुण साकार ईश्वराला मानले आहे. त्यांची ही परब्रह्माविषयीची विचारधारा अत्यंत व्यापक आणि विशाल आहे, पण ती तितकीच सोपी आहे. कबीरांना आपल्या अभ्यासाअंती, अनुभवाअंती जे जे चांगले वाटले ते ते त्यांनी एकत्रित केले आणि त्यामधून एक नवीन विचार निर्माण केला. नव्या विचाराचा नवीन पंथ त्यांनी उभा केला. तोही डोळस आणि माणुसकीचा विचार देणारा प्रांजळ पंथ होय. कबीर आणि तुकाराम यांची परब्रह्माविषयीची विचारधारा फारशी वेगळी नाही. ती एकच आहे. सर्वच संत महंतांची परब्रह्माविषयी येणारी विचारधारा सगुण निर्गुण रूपापेक्षा फारशी वेगळी नाही. शेवटी या दोन्ही विचारधारा कोणत्या ना कोणत्या रूपात ईश्वराशी एकरूप होतातच, हे विसरून चालत नाही. म्हणून परब्रह्म विचारधारा, परब्रह्म ज्ञानविचार ही एकाच ईश्वराचे विविध विचार सांगणारी रूपधारा, ज्ञानसाधना आहे. सुरुवातीच्या काळात तुकारामांनी सगुण



अनुक्रमणिका

साकार रूपात ईश्वराची साधना, भक्ती केली आहे. नंतर मात्र तुकाराम ईश्वराची निर्गुण निराकार रूपाची साधना करताना दिसतात. म्हणून कबीरांची विचारधारा किंवा तुकारामांची विचारधारा परब्रह्माविषयीची एकच आहे, असे म्हणण्यास काहीच हरकत नाही.

संत कबीर म्हणतात– *सूरज चंद्र का एक ही उजियारा। सब महि पसरा ब्रह्म-पसारा ।।* (कबीर ग्रंथावली पृ. २७३)

संत तुकाराम म्हणतात–

*जेथे जेथे देखे तुझीच पाऊले । त्रिभुवन संचले विठ्ठला गा।*

*भेदाभेद मते भ्रमाचे संवाद । आम्हा नको वाद त्यांशी देऊ ।*

*तुका म्हणे अणु तुजविण नाही । नभाहुनि पाही वाढ आहे ।। तु. अ. गा ।।३७।।*

अशी अनेक उदाहरणे देऊन त्यांची परब्रह्म विचारधारा स्पष्ट करता येईल. कबीर-तुकारामांचे परब्रह्म तत्त्वज्ञान हे वैश्विक स्वरुपाचे आहे. ते साऱ्या विश्वाला पुरून उरणारे आहे. ते अक्षर आणि चिरनूतन आहे.

परमात्मा स्वरुपाचे ज्ञान कबीरांना, तुकोबांना भक्तिमार्गाने झाले होते. कर्मयोग किंवा भक्तियोग हे शेवटी आत्मज्ञानात पर्यवसित होऊन मोक्ष म्हणजे जन्म-मरण परंपरेपासून व तिला कारणीभूत होणाऱ्या वासनांपासून मुक्ती देतात. परब्रह्म हे सदैव शुद्ध आहे. कर्म-अकर्म, पाप-पुण्य या सर्व द्वंद्वाहून ते अतीत आहे. शरीर आणि मन यांच्या मलानी ते लिप्त होत नाही आणि त्याला जसे पाप तसे पुण्यही लागत नाही. 'पापपुण्य नाही ठाव । तुका म्हणे सहज भाव (७०८) आत्मस्वरुपाचे जोपर्यंत ज्ञान होत नाही, तोपर्यंत जीवाला या कर्माकर्माच्या व त्यामुळे येणाऱ्या पापपुण्याच्या उपाधी लागल्या आहेत. परमात्मस्वरुपाच्या मूळच्या सहजस्थितीमध्ये कर्माकर्म-पापपुण्य हे काही नाही. मनवाचातीत असे हे परमात्मस्वरूप केवळ भक्तीच्या मापाने मोजले जाते. इतर योगयाग, तप, बुद्धिमत्ता ही साधने तेथे उपयोगी पडत नाहीत. कबीरांचे तत्त्वज्ञान, प्रत्यक्षपणे आध्यात्मिक ब्रह्माशी आत्मा भावनास्वरूप एकरूप होतो. आत्मा आणि परमात्मा यांचा घनिष्ठ संबंध आहे. म्हणून परब्रह्माची आध्यात्मिक रूपाची अनुभूती हाच त्यांच्या साधनेचा विषय बनला होता. भक्तिभावनेच्या पोटी ब्रह्मस्वरुप आत्मा हा परब्रह्माशी एकरूप होतो. त्यासाठी प्रेम आणि भक्ती भावनेची गरज असते. परंतु आत्म्यामध्ये ईश्वर भेटीची ओढ असूनही आणि परब्रह्माच्या ठायी आस्था असूनही त्यांचे मिलन होत नाही. हे मिलन गुरुशिवाय कुचकामी आहे. गुरूकडूनच शिष्याच्या हृदयात ब्रह्माच्या प्रेमाचा अंकुर फुटतो व तो हळूहळू बहरत जातो. कबीरांनी गुरूची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. गुरूला मोठेपणा दिला आहे, तर तुकारामांनी विठ्ठल हाच आपला गुरू मानला आहे. गुरू हेच त्यांच्या जीवनाचे सर्वस्व आहे.

ब्रह्म हे सगुण आहे. निर्गुण निराकार आहे. सोपाधि आणि निरूपाधि अशा स्वरुपात आहे ते सर्वव्यापी, सर्वसाक्षी आहे. परंतु अज्ञानामुळे आम्ही त्याला ओळखू शकत नाही. ब्रह्म हे मोठेही नाही. पातळही नाही. लहानपण नाही. काळेही नाही, श्वेतपण नाही, छायायुक्त नाही, लोहित नाही ते वायुरुपातही नाही, आकाशपण नाही, परंतु या सर्वांनाच ते भरून उरले आहे. परब्रह्माविषयी कबीराची ही विचारधारा तुकारामांच्या विचारधारेसमानच आहे. हे दोन्ही संत म्हणजे अखिल भारतीय समाजाला दिशा देणारे होते. या दोन संतांनी संपूर्ण भारतीय समाजाला अध्यात्माचीच नव्हे तर जगण्याची व लढण्याची नवी दृष्टी दिली. नवी जागृती घडविली. कबीर आणि तुकाराम यांची विचारधारा ब्रह्म ऐक्य वैश्विक स्वरुपाची आहे. त्यामध्ये प्रेम आहे, जिव्हाळा आहे, भक्ती आहे, स्थैर्य आहे, विश्वास आहे, शांती आहे, आत्मविकास आहे. कबीर आणि तुकाराम यांच्या काव्याचा, जीवनचरित्राचा पूर्ण अभ्यास केल्याशिवाय त्यांची ब्रह्मस्वरुप विचारधारा नीटपणे स्पष्ट करता येणार नाही. ''संसार जिस मृत्यू से भय खाता है, शूर और भेत उसीका अभिनंदन हँसते हँसते अपने लक्ष्य के लिए कर लेते हैं ।''[५] त्यांच्या काव्यामधून स्वच्छ प्रवृत्ती आणि स्पष्ट स्वरुपाची विचारधारा बहरलेली दिसून येते. यामागे त्यांचे अनुभवविश्व व्यापक व प्रगल्भ असलेले दिसून येते. कबीरांनी तर साधू, संत, सुफी, योगी, शून्यवाद, सहजवादीचा ब्रह्मवाद, इस्लामचा एकेश्वरवाद आणि सूफीचा प्रेमाचा आश्रय आधार घेतला आहे. आपल्या

विचारांची संसारामध्ये कणनूकण अनिर्वचनीय अलौकिक सत्ता वास करीत आहे, ही शक्तीच आत्म्यातून अनुभूतीतून ती ब्रह्मरूपात अवतरते. ब्रह्माच्या या रूपालाच आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक रूपात आत्मा आणि परमात्म्याला ओळखणाऱ्यांनीच नीट ओळखले आहे. आधिभौतिक भावनेअंतर्गत जी वस्तू जड रूपामध्ये जशी दिसते, त्या व्यतिरिक्त ती दुसरी काहीच नसते. आजची पाश्चात्य विचारधारा प्रकृतीच्या याच रूपाचा स्वीकार करते. स्पेंसर, मिल, कॉन्ट आणि हे गल हे सर्वच याचप्रकारचे विचारक आहेत. भारतात प्राचीन काळापासून बहुदैववादाचा विचार मूलाधार मानला जातो. परंतु ह्या विचारात कबीरांची विचारधारा बसत नाही. कबीर सगुण व निर्गुण अशा दोन्ही स्वरुपाची भक्ती करतात. ह्या दोन्ही विचारातून वर येऊन भक्त हा ब्रह्माच्या निर्गुण, निराकार आणि अनिर्वचनीय रुपाचा स्वीकार करतो. साधक प्रकृतीच्या प्रत्येक वस्तूमध्ये ईश्वराच्या ह्याच रुपाचा स्वीकार करतो. कबीरामध्ये आपणाला पूर्ण रुपामध्ये आध्यात्मिक ब्रह्मभावनेचे दर्शन घडते. तसे ते तुकारामांमध्येही घडते. कुठल्याही प्रकारच्या एका वर्तुळात अथवा सीमारेषेत ब्रह्मविचाराला बंदिस्त करणे हे कबीर आणि तुकाराम या दोघांनाही मान्य नव्हते.

संत तुकारामांनी विठ्ठल हेच आपल्या जीवनाचे सर्वस्व मानले होते. पांडुरंग म्हणजे जीवन ही त्यांची भक्ती होती. विठ्ठल हे ब्रह्माचे प्रतीक आहे. त्याला नाव, रूप नाही. तो अमुक एका ठिकाणीच आहे असे नाही. जिकडे जाल तिकडे तो आहेच. त्याला आकार विकार नाहीत. जग त्याने चराचर व्यापले आहे. तो निर्गुणही नाही व सगुणही नाही. या सापेक्ष शब्दांच्या पलीकडे असणाऱ्या त्याला आपल्यापेक्षा भिन्नत्वाने कोण जाणणार ? कारण तो बुद्धीला अगोचर आहे. 'तुका म्हणे भावे विण । त्याचे मन वोळेना' (२९३५)

*विश्वी विश्वंभर बोले वेदांताचे सार ।। जगी जगदीश ।। शास्त्रे वदती सावकाश ।। व्यापिले हे नारायणे । ऐसे गर्जती पुराणे ।। जनी जनार्दन । संत बोलती वचन । सुर्याचिया परी । तुका लोकी क्रीडा करी ।।* (३७४७)

वेदशास्त्र पुराणे, सत्पुरुष सर्व एकच गोष्ट सांगत आहेत की विश्वात विश्वंभर आहे. जनात जनार्दन आहे. आणि सर्व विश्व नारायणाने व्यापिले आहे.

''तुकोबांनी नामभक्तीचाच पुरस्कार केला आहे... प्रांजल भावनेने केलेली भक्ती त्यांना श्रेष्ठ वाटते. त्यांच्या मते जनातच जनार्दन आहे. (तीर्थी थोंडा पाणी । देव रोकडा सज्जनी) देवासाठी संसार सोडावा लागत नाही' न लगे सायास जावे वनातंरा । सुखे येतो घरा नारायण' इतका तो जवळ आहे, असे तुकोबांचे सांगणे आहे.''[६] विश्वव्यापी असूनही सूर्यनारायण जसा विश्वाच्या गुणदोषांनी लिप्त होत नाही त्याप्रमाणे तुकोबा जनात राहूनही ईश्वरास अलिप्त होत नाही. विठ्ठलावाचून परब्रह्म वेगळे नाही. विठ्ठल हा परब्रह्माचेच प्रतीक आहे. हा तुकोबांचा विचार महत्त्वपूर्ण वाटतो.

कबीरांचा विचार सगुण-निर्गुण, अद्वैत-विलक्षण आणि नीती या रुपातून व्यक्त होतो. ब्रह्म म्हणजे एकता, सरसता, आनंद आहे. ब्रह्म म्हणजे विश्वाची एक महान शक्ती आहे, असे त्यांनी सांगितले आहे. ब्रह्म हे सत्य आणि ज्ञानाने व्यापलेले असते. हजारीप्रसाद द्विवेदी म्हणतात, 'हरि, गोविंद, राम, केशव, माधव इत्यादी पौराणिक नामों से कबीरदास क्वचित कदाचित ही सगुण अवतार के अर्थ में व्यवहार करते हैं ।' एकदम नही करते, ऐसा नाही कहा जा सकता । पर जब वह अपने परम उपास्यको इन नामो से पुकारते है तो सगुण अवतारों से उनका मतलब नही होता । उनका 'अल्लाह' अलख निरंजन देव हैं जो सेवा से परे है, उनका 'विष्णु' वह है जो संसार रूप में विस्तृत हैं, उनका 'कृष्ण' वह हैं जिसने संसार का निर्माण किया है, उनका 'गोविंद' वह है जिसने संसार को धारण किया है, उनका 'राम' वह हैं जो सनातन तत्त्व है, उनका 'खुदा' वह है जो दस दरवाजों को खोल देता है, 'रब' वह है जो चौंरासी लाख योनियों का परवरदिगार है, 'करीम' वह है जो इतना सब कर रहा है, 'गोरख' वह है जो ज्ञान से गम्य हैं, 'महादेव' वह है जो मनको जानता हैं, 'सिद्ध' वह है जो चराचर दृश्यमान् जगत का साधक है, 'नाथ' वह है जो त्रिभुवन का एकमात्र यती या योगी है, जगत के कितने साधक है सिद्ध है, पैगंबर है, वह इस एककीही पूजा करते हैं। अनंत है इसके नाम, अपरम्पार उसका स्वरूप इस प्रकार ब्रह्म के सभी गुणोंका स्वरूप कबीरने विविध नामों के अन्तर्गत किया है[७] कबीरांचा हा विचार व्यापक आहे, ब्रह्म

हे विश्वस्वरूप आहे असे सांगणारा आहे. सर्वच धर्मांचे संत महंत याच परब्रह्माचे गुणगान गातात असा तो सर्वव्यापी, सर्वसाक्षी ईश्वर आहे. ईश्वराचा महिमा अगाध आहे. त्याचा सर्वत्र संचार आहे. हा कबीरांचा ब्रह्मविचार महत्त्वाचा आहे. कबीरांच्या ब्रह्मनिरूपणावर त्या काळातील सर्व वादीयांच्या ब्रह्मविषयक विचारांची छाया पडली आहे. कबीरांच्याजवळ पूर्ण स्वरुपात आध्यात्मिक विचारच सापडतात. कुठेकुठे आधिदैविक भावनाच विद्यमान दिसते, परंतु आधिभौतिक भावनांचा नितान्त अभाव आहे. त्यांचे ब्रह्मवर्णन शास्त्रीय शैलीनुसार नसून ते उपदेशात्मक, भावनात्मक, रहस्यात्मक आणि बुद्धीमूलक शैली अंतर्गत झाले आहे.

**आत्मा-जीव-ब्रह्मैक्य**

परब्रह्म- परमात्मा किंवा परमेश्वर तेवढा खरा असून बाकीचा पसारा व्यर्थ आहे. असा अद्वैताचा सिद्धांत असल्यामुळे तद्भिन्न भासणाऱ्या बाकीच्या वस्तूंचे भिन्नत्व खरे नाही. त्याच्याशिवाय दुसरे कशाचेच अस्तित्त्व नाही.

*'एका जिवे आता जिणे जाले दोन्ही । वेगळीक काही नव्हे आता। नारायण आम्हा नाही वेगळीक । पुरविली हे भाक सांभाळली ।'*

नारायण आणि मी आता एकाच जीवाने जगत आहोत. त्याच्या माझ्यामध्ये आता वेगळीक उरली नाही. ही स्थिती प्राप्त व्हावी. सर्व नारायणच व्हावा आणि मी वेगळा उरूच नये यासाठीच हा सर्व आटापिटा होता तो सफळ झाला.

कबीरांनी आत्मा प्राण-जीव एकच मानले आहेत. विशेष करून त्यांच्या पदात व साखीयाँ मध्ये आत्म्याचे निरूपण आले आहे. आत्म्यासंबंधी विचार त्यांच्या साहित्यामध्ये जिथे जिथे आला आहे, तो ब्रह्ममय होऊनच अवतरला आहे. स्वतंत्रपणे ब्रह्मविषयक त्यांचे विचार फारच कमी प्रमाणात सापडतील. कबीरांनी आत्मा आणि परमात्मा यांच्या एकरूपतेवरच भर दिला आहे. हाच अद्वैतवादाचा प्रधान विचार आहे. आत्म्याचे वर्णन कबीरांच्या साहित्यात भावनात्मक आणि विचारात्मक दोन्ही प्रकारचे सापडतात. खरे तर कबीरांनी अध्यात्माच्या सगळ्या मूलतत्त्वालाच भावना आणि बुद्धी या दोन्हींच्या कसोटीवर परखडपणे तपासण्याचा प्रयत्न केला आहे. कबीरांच्या रहस्यवादी रचनांमध्ये आत्मविचार भावना स्वरुपात फारच सुंदरपणे व्यक्त झाला आहे,

कबीर आत्म्याला संपूर्ण संसारव्याप्त मानतात आणि ह्या विश्वात्मक आत्म्यालाच ते विश्वात्मा मानतात. आत्मा हाच ईश्वर आहे. हेच तुकारामांनी सुद्धा वरील अभंगाच्या ओळीतून सांगितले आहे. नारायण आणि जीव एकच झाले आहेत. म्हणजे जीव हाच शिव आहे हे तुकारामांनीही सांगितले आहे. कबीर व तुकाराम याचा आत्मा-जीव-ब्रह्मैक्य विचार एकच आहे. आत्मा हाच परमात्मा आहे. या विषयी यज्ञदत्त म्हणतात, ''आत्मा विश्वात्मा का वह रूप है जो माया द्वारा विश्वात्मा से प्रथक कर दिया जाता है ।''

*जल में कुम्भ कुम्भ मे जल है बाहर भीतर पानी ।*
*फूटा कुम्भ जल जलही समाना यह तथ्य कथ्यो गियानी ।*
(क.ग्रं. पृ. १०५)

नदीमधून एक घागरपाणी भरून ते नदीतच ठेवले तर घागरीतील पाणी घागर भरल्या कारणाने ते नदीच्या पाण्यापासून वेगळे होते. प्रवाहपतित होत नाही परंतु हीच ती मातीची घागर फुटली तर तेच पाणी पुन्हा नदीच्या पाण्यात प्रवाहात सामील होईल. हीच दशा आत्मा आणि विश्वात्म्याची आहे. वेदांताचे पण आत्म्यासंबंधी हेच मत आहे. वेदान्त माया अबद्ध आत्म्यालाच जीव म्हणतो. तसे तुकाराम देव भक्ताचे जीव शिवाचे ऐक्य अनेक दृष्टांतानी स्पष्ट करतात.

*रवि रश्मिकला । नये काढीता निराळा ।*
*तैसा जाला आम्हा भाव । अंगी ज़डोनी ठेला देव ।*
*गोडी साकरेपासूनी । कैसे निवडीती दोन्ही ।*
*तुका म्हणे नाद उठी। विरोनी जाय नभापोटी ।।५७७ ।।*

रवि आणि त्यांचे किरण, साखर व तिची गोडी, घंटा व तिचा नाद ही जशी वेगळी करता येत नाहीत, त्याप्रमाणे जीव शिव ऐक्य वेगळे करता येत नाही. गोडी आणि गूळ, उदक आणि तरंग, सुवर्ण आणि अलंकार हे जसे एकरूप आहेत तसेच जीव शिवाचे एकरूपत्व आहे. जीव हा शिवच असल्यामुळे त्याला मरण नाही. मरण हा देहाचा धर्म आहे. देहात्मभाव सोडला की जीवात्मा अमर आहे. अनंताप्रमाणेच तो अनंत आहे. अनंत तुमचा जीव आपल्या जीवात मिळवून घेईल. अनंताशी तादात्म्य पावल्यावर जीवाला अंत कुठला ? अनंताप्रमाणेच तो अनंत अमर व

अविनाशी होईल. कारण कबीरही आत्म्याला तेजस्वी व निराकार मानतात, आत्मा निरंजन आहे म्हणतात. कबीर आत्म्याला अमर मानतात. आत्मा हाच अदैत तत्त्व आणि ब्रह्म आहे असे त्यांनी मानले आहे. याविषयी यज्ञदत्त म्हणतात, ''आत्मा कबीर के विचार से शक्तीशाली, चेतनस्वरुप, ज्ञानस्वरुप और आनंदस्वरुप है । वास्तव में आत्मा और परमात्मा में कबीर के निकट कोई विशेष भेद नहीं है ।''

...कबीर आत्मा को अनादी मानते है । कबीर ने आत्मा को सैद्धांतिक रूप से अद्वैत-वादियों के मतानुसार वर्णित किया है ।[८] कबीर आत्मा-जीवा अमर मानतात. आत्मा हे ईश्वराचेच रूप ते मानतात. हा कबीरांचा विचार तुकारामांच्या विचारांशी मिळताजुळता आहे. तुकाराम कबीर यांचे अध्यात्मचिंतन, ब्रह्मविचार एकरूप व एकसंघ असल्याचे पावलोपावली जाणवते.

१) ज्ञानात्मक, २) भावनात्मक, ३) यौगिक

**ज्ञानात्मक** - ज्ञानीलोक आत्मा व परमात्म्यात भेद मानत नाहीत. त्यांचे म्हणणे आहे की हा भेद माया स्वरुप आहे. परंतु साधनेच्या रूपाने जीवात्मा या मायेच्या आवरणाला फोडून टाकतो. तेव्हा आत्मा आणि परमात्म्याचे मिलन होते आणि जीवात्मा जीवन-मरणाच्या बंधनातून मुक्त होतो. मोक्षाच्या या भावनेला व्यक्त करीत आत्मा व परमात्म्याच्या संबंधावर कबीरदास व तुकाराम या दोघांनीही खूप चांगले वर्णन केले आहे.

**भावनात्मक** - आत्मा आणि ब्रह्म यांचा संबंध ज्ञान आणि बुद्धिद्वारा होतो त्याला ज्ञानात्मक म्हटले जाते. परंतु जो संबंध भावनाश्रित होतो त्यामध्ये पण भक्ताला प्रेमभावनेने साधना करावी लागते. कबीरांचे रहस्यवादी चित्रण ह्याच भावनेचे उदाहरण आहे, तर तुकारामांनी देव भक्त यांच्या अनुषंगाने येणाऱ्या अभंगात यांचे सुंदर चित्रण केले आहे.

**यौगिक** - यौगिक साधनेच्या विषयी कबीरांनी लिहिले आहे. त्यानुसार भौगिक तादात्म्य पण महत्त्वाचे आहे.

अशाप्रकारे तीन प्रकारच्या ब्रह्म व जीव यांच्या तादात्म्यावर इथे विचार केला आहे. तिन्हीतही कबीरांच्या विचारांची झलक दिसून येते. त्यांच्या विचारांवर शंकराचार्य आणि उपनिषदांचा प्रभाव दिसून येतो. आत्मतत्त्वाच्या अद्वैतभावनेविषयी आणि एकतेविषयी कबीरांचे विचार फार दृढ आहेत, हे अनेक अभ्यासकांनी त्यांच्या ग्रंथात मान्य केले आहे.

**जगत ब्रह्मैक्य**

तुकाराम म्हणतात–

*लवण मेळविता जळे । काय उरले निराळे ।*
*तैसा समरस जालो । तुज माजी हरपलो*
*तुका म्हणे होती । तुझी माझी एक ज्योती* (२४८४)

पाण्यात मीठ मिसळले की वेगळे राहात नाही तसा मी तुझ्याशी समरस होऊन पूर्णपणे विलीन झालो. कारण तुझ्यात व माझ्यात एकच आत्मज्योती होती. तुझ्या माझ्यात भेद नाही. 'मी तो तूच हा निर्धार' तू बोलशी माझ्या मुखे, 'तुका म्हणे बिंब छाया ठायी पावली विलया' (३०६९) जीवात्मा हा परमात्म्याचे प्रतिबिंब आहे. ते उपाधी गेली की मूळ बिंबात विलीन होते. 'जीवा मरण नाही स्वभावे' जीव मुळातच अमर आहे. परब्रह्मापेक्षा वेगळा असा विश्वप्रपंच झालाच नव्हता त्याचप्रमाणे जीवही वेगळा कधीच नव्हता हे समजले. 'ते ब्रह्म तू आहेस' या महावाक्याचा बोध होऊन ब्रह्मानंद झाला व तुकोबा परब्रह्माशी एकरूप झाले.

*जग अवघे देव । मुख्य उपदेशाची ठेव ।*
*आधी आपण या नासी । तरी उत्तरे ये कसी ।*
*ब्रह्मज्ञानाचे कोठार । ते हे निश्चये उत्तर ।*
*तुका म्हणे हे उन्मनी । नास कराया कारणी ।।१३३८ ।।*

संपूर्ण जग हे देवाचे स्वरूप आहे हा तुकोबांच्या उपदेशाचा गाभा आहे. जगतब्रह्मैक्य तुकारामांनी जाणले होते. याविषयी शं. दा. पेंडसे सांगतात–

'परब्रह्म परमात्मा किंवा परमेश्वर तेवढा खरा असून बाकीचा पसारा व्यर्थ आहे, असा अद्वैताचा सिद्धांत असल्यामुळे तद्भिन्न भासणाऱ्या बाकीच्या वायूचे भिन्नत्व खरे नाही, त्याच्याशिवाय दुसरे कशाचेच अस्तित्व नाही. तोच सर्वत्र आहे अशी अनुभूती असणारा जीवही त्यांच्यापेक्षा वेगळा असू शकत नाही. *एका जिवे आता जिणे जाले दोन्ही । वेगळीक काही नव्हे आता ।*

*नारायण आम्हा नाही वेगळीक ।*
*पुरविली ते भाक सांभाळीली ।।*

अशी आर्त विनवणी केल्यानंतर तुकोबा म्हणतात,



अनुक्रमणिका

नारायण आणि मी आता एकाच जीवाने जगत आहो त्याच्या माझ्या मध्ये आता वेगळीक उरूच नये याकरिता सर्व सायास होते ते सफल झाले. चांगले अभ्यासले होते, अनुभवाची परिपक्वता प्रगल्भ झाली होती. पण परब्रह्मापेक्षा निराळे अस्तित्व नष्ट करून जो स्वतः परब्रह्म स्वरूप बनेल तोच 'सर्व खलु, इदं ब्रह्म' हे जाणण्याच्या कसाला उतरेल. हे सर्व ब्रह्म आहे. जगत् आणि जीव त्यांच्यापेक्षा भिन्न नाहीत हे जाणणे हेच ब्रह्मज्ञानाचे कोठार आहे. देहाचा किंवा जगाचा आकार म्हणजे परमेश्वर नव्हे. देहाचा विनाश आपण प्रत्यक्ष पाहतो. तसाच जगाचा आकारही विनाशी आहे. पण हा आकार ज्यावर दिसतो तो अविनाशी पांडुरंग ओळखला पाहिजे. सर्व घरांत म्हणजे सर्व देहात जसा पांडुरंग आहे तसा अवघ्या जगातही तोच आहे. आकार येतात व जातात ते ज्यावर दिसतात तो पांडुरंग मात्र अविनाशी आहे. दूध, दही, लोणी, तूप एका दुधाचेच प्रकार आहेत. सोन्याचे अनेक दागिने सोनेच असतात. मातीचे नाना प्रकारचे घट केले तरी ती सर्व मातीच असते. त्याप्रमाणे विविध दिसणारे हे सर्व दृष्यजात एक परब्रह्मच आहे. एकच अनेक झाले तरी त्या अनेकत्वात एकपणाच असतो. तुकारामांनी हा विचार अत्यंत परखडपणे मांडला आहे. तुकोबांच्या आणि कबीरांच्या काव्यातून परब्रह्म, परमात्मा, जीव जगत् याविषयीचे विचार अत्यंत स्पष्टपणे व्यक्त झाले आहेत.

**मोक्ष विचार :** कबीर आणि तुकाराम यांचा मोक्ष विचारही एकच आहे. तुकारामांनी तर मोक्षापेक्षा भक्ती श्रेष्ठ मानली आहे. याचा अर्थ त्यांनी मोक्षास कमी लेखले आहे, असे नाही. तुकाराम म्हणतात.

*नाही देवापाशी मोक्षाचे गाठोडे । आणुनि निराळे द्यावे हाती ।*

*इंद्रियांचा जय साधुनिया मन । निर्विषय कारण असे तेथे।*

*स्वप्नीच्या धावे विवळसी वाया । रडे रडतियासवे मिथ्या।*

*तुका म्हणे फळ आहे मुळापाशी । शरण देवाशी जाय वेगी ।।२३२५।।*

मोक्ष म्हणजे काय याची उत्कट कल्पना तुकोबांनी या अभंगात दिली आहे. मोक्ष म्हणजे आपल्या स्वाधीन नसणारी, दुसऱ्या कोणाकडून तरी दिली जाणारी व कदाचित मरणोत्तर परलोकात मिळणारी अशी गोष्ट आहे. अशी जी सामान्यतः समजूत असते ती बरोबर नाही. देवाजवळ मोक्षाचे गाठोडे नाही, की जे तो तुमच्या हातात वेगळे आणून देईल. मोक्ष म्हणजे कशाच्यातरी बंधनातून मुक्त म्हणजे स्वतंत्र होणे. आत्मा हा स्वतंत्र असल्याने त्याची ही नैसर्गिक प्रवृत्ती आहे. सामाजिक, धार्मिक, राजकीय स्वातंत्र्याच्या कल्पना या मूलभूत स्वातंत्र्याच्या कल्पनेतून उदय पावतात. मूळच्या शांत रसातूनच शृंगारादि इतर रस जसे निर्माण होतात तसाच हा प्रकार आहे. आपले मूलभूत स्वातंत्र्य विसरून जीवात्मा प्रकृतीच्या मनाच्या व इंद्रियांच्या ताब्यात जातो, या पारतंत्र्यातून मुक्त होणे म्हणजेच मोक्ष मिळविणे होय.

कबीरांनी मोक्ष म्हणजे जन्म-मृत्यूच्या बंधनातून मुक्त होणे असे मानले आहे. मोक्ष म्हणजे आत्मा-परमात्म्याचे मिलन होय असे कबीर मानतात. कबीरांनी 'मोक्ष' यासाठी काही शब्दांचा वापर केला आहे. 'निर्वाणपद', 'अभयपद', व 'परमपद' या नावानी मोक्षपद ओळखले जाते. कबीरांनी हा शब्द प्रयोग भक्त आणि वेदांती लोक ज्याप्रमाणे मोक्षासाठी शब्दप्रयोग वापरतात त्याच शब्दप्रयोगाचा वापर त्यांनी केला आहे. यज्ञदत्त म्हणतात, ''मुक्ती के पश्चात् कबीरदास जी आत्मा को जन्म-मरण के बंधनो से मुक्त मानते हैं । मुक्तात्मा का कबीरदास जी ब्रह्म में इस प्रकार तादात्म्य मानते हैं कि, फिर दोनों का पृथक होना असम्भव हैं ।'' मोक्ष म्हणजे जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून मुक्ती मिळून ईश्वराप्रत पोहचणे, ईश्वरच होऊन राहणे.''[१०] हाच विचार वरील संदर्भात व्यक्त केला आहे. कबीर आणि तुकाराम या दोघांचीही मोक्ष संकल्पना एकच आहे. मोक्ष हे अत्यंत कठीण तपश्चर्येने साधनेनेच प्राप्त होते, ते सहजा सहजी मिळत नाही. तुकाराम म्हणतात, ''इंद्रियावर विजय मिळवून मन निर्विषय करणे हेच मोक्ष प्राप्तीचे साधन आहे. वस्तुतः आपण मुळात मुक्तच असताना बद्ध आहो असे समजणे म्हणजे स्वप्नात झालेल्या शस्त्राघाताने विवळणे आहे. त्यामुळे रडणारा व त्याचे रडे दोन्ही मिथ्या आहेत म्हणून आपले मूळ स्वरूप ओळखले पाहिजे व त्याकरिता ईश्वराला शरण गेले पाहिजे. ईश्वराला शरण जाणे म्हणजे आपला देहअहंकार संपूर्णपणे त्याच्या

चरणावर अर्पण करणे होय. देह म्हणजेच मी हा अज्ञानमूलक अहंकार बद्धतेच्या मुळाशी आहे. तो गेला की जीवात्मा वेगळा राहात नाही. त्याच्या मनाचे संकल्प विकल्प थांबतात. ते निर्विषय होते आणि जीवाच्या उपाधी नष्ट झाल्या म्हणजे त्याच्याशी आपला काही संबंध नाही अशी अनुभूती आली म्हणजे तो परमात्म्याशी एकरूप होऊन त्याची मूळची स्वाभाविक, मुक्तता त्याला प्रतित होते हाच मोक्ष होय.''[११] हा तुकारामांचा विचार स्पष्ट आणि सहज आहे. पण तितकाच तो अनुभव आणि साधनेच्या संस्कारातून अवतरलेला दिसून येतो. मोक्ष देवापाशी नाही. स्वतःजवळच आहे. असा हा थोडा कबीराहून वेगळा विचार तुकारामांनी मांडला आहे. कबीर ईश्वराप्रत पोहचणे, ईश्वरास मिळणे ईश्वरच होऊन राहणे यास मोक्ष मानतात, तसेच जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून मुक्ती मिळून आत्मा ईश्वरात विलीन होणे या पारंपरिक पद्धतीने कबीरांनी मोक्ष मानला आहे, तर तुकाराम मोक्ष देवाजवळ नाही, तो स्वतःजवळच आहे असे सांगतात. ते मिळवण्यासाठी काय केले पाहिजे याचे विवरण वर आले आहेच. कबीर आणि तुकाराम यांच्या मोक्ष विचारात थोडासा फरक वाटत असला तरी तो एकच आहे, या दोन्ही वाटा ईश्वरासच येऊन मिळतात. तुकारामांनी मनाचे संकल्प विकल्प व अज्ञानमूलक अहंकार बद्धतेने जीवात्म्यास बाधतो, हा सर्व गळून पडला की जीवाच्या उपाधी नष्ट होऊन तो परमात्म्याशी एकरूप होतो हा तुकारामांचा विचार अत्यंत डोळस स्वच्छ आणि व्यापक आहे. तर कबीरांचा जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून मुक्ती मिळणे म्हणजे मोक्ष हा पारंपरिक पद्धतीचा विचार आदर्श व व्यापक आहे. कबीर तुकाराम यांची मोक्ष विचारधारा ही अशी एकाच पातळीवर यात असूनही तीत अशी स्वतंत्रता आहे, थोडासा वेगळेपणा आहे हे मान्य करावे लागते.

मोक्ष विचाराविषयी कबीर अद्वैती भावना घेऊन चालतात. 'कबीरने मुक्ती की अवस्था को ब्रह्मकारता की अवस्था माना है ।' मुक्ती अवस्थेला ब्रह्माची अवस्था मानतात. यज्ञदत्त म्हणतात, 'उनका मत यह हैं कि, जीव ब्रह्मस्वरूप होकर उसी के समान सत् चित् और आनंद रूप हो जाता है ।[१२] ही कबीरांची विचारधारा तुकारामांच्या विचारधारेशी जुळणारी आहे. कबीर व तुकाराम यांची मोक्ष विचारधारा एकच आहे. हे कबीर आणि तुकारामांच्या विचारांती स्पष्ट होते.

कबीर तुकारामांचे परब्रह्म, परमात्मा, जगदीश, जीव-जगत बंध, मोक्ष याविषयीचे विचार हे असे आहेत.

संत कबीर आणि तुकाराम यांच्या भक्तीचे स्वरूप अत्यंत विशाल, उदात्त आणि अनंत अशा उच्चकोटीचे होते. त्यांची भक्ती निरागस, निरासक्त, निरंतर होती. सजग आणि डोळस भक्ती खऱ्या अर्थाने संत कबीर आणि संत तुकाराम यांनी केली आहे. ईश्वर हाच त्यांच्या भक्तीचे केंद्रस्थान होता. कारण ईश्वर हाच सृष्टीकर्ता आहे. तो सर्वव्यापी, जळीस्थळी, काष्टीपाषाणी चराचरात भरून राहिला आहे. तो निर्गुण निराकार आहे. आणि सगुण





अनुक्रमणिका

साकार आहे ही त्यांची विचारधारा भक्तिपरंपरेला बळकटी देते. दोन्हीही संतांची परब्रह्माविषयी असणारी विचारधारा जवळजवळ एकच आहे.

भक्तिमार्गातून पुढे जातानाच या दोन्ही संतांनी भारतीय समाजाला अध्यात्माचीच नव्हे तर जगण्याची व लढण्याची एक नवी दृष्टी दिली, नवी जागृती घडविली. त्यांची विचारधारा वैश्विक स्वरूपाची आहे. त्यामध्ये प्रेम आहे, जिव्हाळा आहे, भक्ती आहे, स्थैर्य आहे, विश्वास आहे, शांती आहे, आत्मविकास आहे.

संत तुकारामांनी विठ्ठल हेच आपल्या जीवनाचे सर्वस्व मानले. पांडुरंग म्हणजेच जीवन ही त्यांची भक्ती होती. विठ्ठल हे ब्रह्माचे प्रतिक आहे. त्याला रूप नाही, आकार नाही, तो अमुक एका ठिकाणी आहे असे नाही जिकडे जाल तिकडे तो आहेच. तो निर्गुणही नाही व सगुणही नाही. या सापेक्ष शब्दाच्या पलीकडे असलेल्या त्याला आकार विकार नाहीत. जग त्याने चराचर व्यापले आहे. त्याला आपल्यापेक्षा अधिक कोण जाणणार, कारण तो बुद्धीला अगोचर आहे. तर संत कबीर सांगतात, सगुण निर्गुण अद्वैत विलक्षण आणि नीती रूपातून, ब्रह्म म्हणजे एकता समरसता, सरसता आनंद आहे. ब्रह्म म्हणजे विश्वाची एक महान शक्ती आहे. ईश्वर सर्वव्यापी सर्वसाक्षी आहे. ईश्वराचा महिमा अगाध आहे. त्याचा सर्वत्र संचार आहे. कबीरांचा हा विचार महत्त्वपूर्ण आहे. विशेषतः संत कबीर आणि संत तुकाराम यांनी ब्रह्माविषयी मांडलेला विचार म्हणजे ईश्वराविषयी मांडलेला विचार हा बराच साम्यलक्षी आहे.

परब्रह्म परमात्मा किंवा परमेश्वर तेवढा खरा असून बाकीचा पसारा व्यर्थ आहे. 'एक जिवे आता जिणे जाले दोन्ही । वेगळीक काही नव्हे आता । नारायण आम्हा नाही वेगळीक । पुरविली हे भाक सांभाळीली । नारायण आणि मी आता एकाच जीवाने जगते आहोत. त्याच्या माझ्यामध्ये आता वेगळीक उरली नाही ही तुकारामांची विचारधारा आहे. तर कबीर आत्म्याला संपूर्ण संसार व्याप्त मानतात आणि ह्या विश्वात्मक आत्म्यालाच ते विश्वात्मा मानतात. आत्मा हाच ईश्वर आहे, नारायण आणि जीव एकच झाले आहेत. म्हणजे जीव हाच शिव आहे. संत कबीर आणि संत तुकाराम यांचा आत्मा-जीव-ब्रह्मैक्य विचार एकच आहे, हेच इथे दिसून येते.

**संदर्भसूची**


१) शर्मा यज्ञदत्त - कबीर साहित्य और सिध्दांत - पृष्ठ - ६०, अक्षरम् प्रकाशन, प्रथमावृत्ती - १९८४
२) सिंह पुष्पपाल - कबीर ग्रंथावली - पृष्ठ - १९, पल्लव प्रकाशन दिल्ली, प्रथम संस्करण - १९८७.
३) सरदार गं. बा. तुकाराम दर्शन - पृष्ठ १७, मॉडर्न बुक डेपो, पुणे, पहिली आवृत्ती - १९६८.
४) शर्मा यज्ञदत्त - कबीर साहित्य और सिद्धांत-पृष्ठ - ५८, अक्षरम् प्रकाशन - प्रथमावृत्ती - १९८४.
५) सिंह पुष्पपाल - कबीर ग्रंथालय- पृष्ठ - १७, पल्लव प्रकाशन, दिल्ली, प्रथमावृत्ती - १९८७.
६) नसिराबादकर ल. रा. - प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास- पृष्ठ - १२९, फडके प्रकाशन कोल्हापूर, सहावी आवृत्ती - १९९७.
७) द्विवेदी हजारीप्रसाद - कबीर ग्रंथावली - पृष्ठ - ११५-११६.
८) शर्मा यज्ञदत्त - कबीर साहित्य और सिद्धांत - पृष्ठ - ७०, अक्षरम् प्रकाशन, प्रथमावृत्ती - १९८४.
९) पेंडसे शंकर दामोदर - साक्षात्कारी संत तुकाराम - पृष्ठ - ६१, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, द्वितियावृत्ती - १९९८.
१०) शर्मा यज्ञदत्त - कबीर साहित्य और सिद्धांत - पृष्ठ- ७२, अक्षरम् प्रकाशन- प्रथमावृत्ती - १९८४.
११) पेंडसे शंकर दामोदर - साक्षात्कारी संत तुकाराम - पृष्ठ -७२, कॉन्टिनेंटर प्रकाशन, पुणे, द्वितीयावृत्ती १९९८.
१२) शर्मा यज्ञदत्त - कबीर साहित्य और सिद्धांत - पृष्ठ - ७२, अक्षरम् प्रकाशन प्रथमावृत्ती १९८४.


❖❖❖


**प्रा. डॉ. संजय संभाजी लांडगे**

**१९७, 'हरणाई निवास' संजय नगर, कुमठा नाका, सोलापूर - ४१३ ००३.**

# ‘उजळावया आलो वाटा...’

□ डॉ. रामचंद्र देखणे



श्री संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांची अभंगवाणी हे मराठी सारस्वताचे एक अनमोल लोकधन आहे. त्यांची अंतर्मुख वृत्ती, कठोर आत्मपरीक्षण, सखोल भावना, डोळस श्रद्धा, सामान्यांच्या अनुभवविश्वाचे सूक्ष्म अवलोकन आणि वाणीतील परखडपणा, परतत्त्व स्पर्श, प्रासादिकता यामुळे तुकाराम महाराजांच्या मुखातून बाहेर पडणाऱ्या सहज उद्‌गारांनाही श्रेष्ठ कवित्त्वाची उंची लाभली. त्यांचा प्रत्येक शब्द अभंग होऊन मराठी माणसाच्या ओठाओठावर खेळू लागला.

संत बहिणाबाईंनी महाराष्ट्राच्या संतपरंपरेचे वर्णन एका अभंगात मार्मिकपणे केले आहे. हा अभंग वारकरी फडाबरोबर इतरही क्षेत्रात नित्याच्या पाठातला आहे.

*संतकृपा झाली । इमारत फळा आली ।।*
*ज्ञानदेव रचिला पाया । ऊभारिले देवालया ।।...*
*तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ।।*

संतश्रेष्ठ ज्ञानदेवांनी भक्तिमंदिराचा पाया घातला, तसाच भागवतधर्माचाही. भागवत धर्माच्या तत्त्वविचारांचा आणि तत्त्वज्ञानाचा पाया घातला. सामाजिक समतेचा आणि समतेच्या सिद्धांताचा पाया घातला. पण साहित्य आणि तत्त्वज्ञान याचा विचार केला असता हे स्पष्टपणे लक्षात येते की माऊलींनी अद्वैत तत्त्वज्ञानाची वेगळी दृष्टी दिली आणि तत्त्वज्ञानातून शुद्ध आचारप्रणाली सांगितली. तत्त्वज्ञान हे गूढ संकल्पांमधून मुक्त करून त्याला सुलभ केले. अज्ञ, अडाणी जनांना समजेल आणि आचरण करता येईल इतके ते सोपे केले. तसेच महाराष्ट्र सारस्वतातील अभंग, ओवी, भारुड, गवळण या साऱ्या वाङ्‌मय प्रकारातील आद्य रचना करून ह्या वाङ्‌मय मंदिराचा पायाही माऊलींनी घातला. मंदिराचा कळस उंच उंच जात असतो. त्यावर झेंडा फडकत असतो. कुठून दुरूनही आणि कुणालाही सहजपणे कळसाचे दर्शन घडते. एकवेळ मंदिराच्या गाभाऱ्यातील देवाच्या दर्शनासाठी रांग लावावी लागते. दर्शन मिळणे दुरापास्त होते. पण कळसाचे दर्शन कुणालाही सहजपणे घडते; कारण तो उंचावरून झळाळत असतो. सर्वांच्या दृष्टिपथास येत असतो. मंदिराच्या उत्तुंगतेचे ते द्योतक असते. कळसाच्या दर्शनानेही भाविक सुखावतो. संतश्रेष्ठ तुकोबाराय हे तत्त्वचिंतनाच्या आणि विशेषत्वाने मराठी सारस्वताच्या ह्या वाङ्‌मय मंदिराच्या कळसावर शोभतात. कळस जसा गर्दीतल्या सर्वांना दिसतो, सहजपणे पहाता येतो तशी तुकोबारायांची अभंगवाणी सर्वांना अनुभवता येते. तिच्यातील सुलभता, रसाळता, उच्च तत्त्वांची मांडणी; तरीही तत्त्वज्ञानाची परिभाषा सोडून सहजपणे प्रकटलेली जनलोकांची बोली वाणी यामुळे ती सर्वांना आपली आहे असे वाटते. उत्कृष्ट भावदर्शनाने ती कळसासारखी उंचावते, विचारतत्त्वाने कळसासारखी चमकते आणि साधेपणाने सर्वांना दृग्‌चर होते. खरोखरच ‘तुका झालासे कळस’ याचा साक्षात् अनुभव येतो.

साहित्य, तत्त्व, विचार, भाषा, रसाळता, भावोत्कटता, भक्ती, ज्ञान, वेदांतविचार, जनलोकांचे अनुभवविश्व, सामाजिक विचार, जागृती, प्रबोधन, उद्‌बोधन या साऱ्या

गुणांमुळे तुकोबारायांची अभंगवाणीही लोकधनाच्या पदवीला जाऊन बसली आहे. ह्या अभंगवाणीने एकीकडे विश्वातील परमात्मा शोधला आहे तर दुसरीकडे परमात्म्याचे विश्व समर्थपणे उभे केले आहे. एकीकडे परमात्म्याशी नाते जोडले आहे तर दुसरीकडे जनलोकांशी कमालीची जवळीकता साधली आहे. आपल्या अभंगवाणीतून विष्णुमय जग पहाण्याची व्यापक दृष्टी ते सहजपणे देऊन जातात.

*विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ।।*

तर त्या दृष्टिक्षेपातून भेदाभेदांवर आघात करीत ते सामाजिक परिर्वतनही घडवितात. तुकोबारायांची अभंगवाणी हे लोकशिक्षणाचे प्रभावी साधन आहे. नैतिकतेचे शिक्षण देणारे ते ज्ञानभांडार आहे. नीतिमूल्यांचे संवर्धन करणे हा आध्यात्मिक जीवनाच्या दृष्टीने महत्त्वाचा टप्पा आहे. संतांचे प्रबोधनकार्यही नीतिमूल्यांच्या रक्षणासाठीच आहे. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज म्हणतात–

*आम्हा हे कौतुक जना द्यावी नीत ।*
*करावे फजित चुकती ते ।।*
*तुका म्हणे येथे खऱ्याचा विकरा ।*
*न सरती येरा खोट्या परी ।।*

अनीतीच्या मार्गाने जाणाऱ्या जीवांना नीतिमार्ग दाखववावा आणि जे कोणी सांगूनही चुकत असतील त्यांची फजिती करावी हेच आमचे कौतुकास्पद काम आहे. नीतिधर्माची उजळण करण्यासाठी आम्ही सत्य वस्तूचाच उपदेश करीत आहोत. म्हणूनच खोटा प्रकार येथे खपला जाणार नाही अनीतीमध्ये दांभिकता आहे. अनीतीमध्ये खोटेपणा दडला आहे. नैतिकता हे मानवीजीवनाचे उत्तुंग शिखर आहे. जे जे काही मानवाला व जगताला दिव्य व परिपूर्ण जीवनाप्रत नेते त्यालाच शुभ असे म्हटले जाते. आणि ह्या परिपूर्तीला अडथळा करून तिचा जे जे भंग करते ते ते अशुभ होय, ते अमंगळ होय. म्हणूनच तुकोबारायांनी भेदाभेदाच्या कल्पनेलाही अमंगळ म्हटले आहे. त्यांच्या समतेच्या विचाराला तत्त्वज्ञानाची बैठक आहे. नीतिमूल्ये ही अशुभाकडून शुभ अवस्थेकडे मानवाला परिवर्तित करतात. आध्यात्मिक पातळीवर गेलो की आपण शुभाशुभांच्याही पलीकडे जाऊन पोहोचतो. कारण त्या पातळीवर शुभ किंवा अशुभ आपण ज्याला म्हणतो त्याच्या प्रयोजनाची व दिव्य उपयोगितेची जाणीव झालेली असते. नैतिक जीवन जगण्यासाठी मानवी स्वभावाचे समग्र परिर्वतन घडणे आवश्यक ठरते. त्यासाठी मनाचे शुद्धीकरण घडायला हवे. मनाचे शुद्धीकरण आणि समग्र परिवर्तन यासाठीच तुकोबारायांची प्रबोधनवाणी अभंगरूपात उभी रहाते आणि कधी अर्जवाने सांगून, कधी उपदेश करून, कधी विनंती करून तर कधी रागावूनही लोकमनाला परिवर्तित करते. तुकोबारायांच्या अभंगवाणीचे सामर्थ्य विलक्षण आहे. भगवान श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत एका करंगळीवर उचलून धरला. भगवान श्रीकृष्णाच्या त्या करंगळीचे सामर्थ्य तुकोबारायांच्या प्रत्येक शब्दाशब्दाला लाभले आहे.

मानवी देह हा शुद्ध परमात्मस्वरूप असतानाही अत्यंतिक विषय वासनांच्या आहारी गेल्यामुळे तो मूळ स्वरूपापासून कसा दुरावतो याचे चित्रण उभे करताना तुकोबाराय सांगतात–

*भूमी अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ।।*
*तैसे वोसपले जीव । सांडी नसता अंगी घाव ।।*
*जीव अवघा देव । खोटा नागवी संदेह ।।*
*तुका म्हणे शुद्ध । मग तुटालिया भेद ।।*

संतांनी अभंगरचना दोन हेतुने केली. एक उद्देश म्हणजे स्वान्तसुखाय आणि दुसरा मार्गदर्शनाय. त्यापैकी पहिला हेतू हा त्यांच्या स्वतःपुरता होता व त्यातून निर्माण झालेले काव्य पराकाष्ठेचे अंतर्मुख व आत्मपर होते. परंतु तुकोबारायांचे व्यक्तिमत्त्वच लोकांसाठी होते म्हणूनच अभंगांतून व्यक्त झालेली अंतर्मुखताही जगाला उद्बोधक ठरली. अंतर्मुख होऊन आपल्याच मनाशी केलेला संवाद इतरांना मार्गदर्शक ठरला. अभंगातून तुकोबारायांचे व्यक्तिमत्त्व उभे राहाते. तात्त्विक विचारांबरोबर सकलांच्या जीवनात आनंदावस्था देणारा समाजविवेक तुकोबारायांनी ठायी ठायी मांडला आहे. तुकोबारायांचे जागृतीचे अभंग हे त्यांच्या सामाजिक तत्त्वचिंतनाचे महान द्योतक आहे. ईश्वरनिष्ठा, विवेकसंपन्नता याबरोबरच कर्तव्यतत्पर तसेच समृद्ध जीवन जगणारा समाज निर्माण व्हावा आणि सामुहिक जीवनासाठी आवश्यक असणारी नीतिमूल्ये त्यात रुजावी. या भूमिकेतून त्यांनी जागृतीचे अभंग लिहिले आहेत. आध्यात्मिक जागृतीबरोबरच किंबहुना त्याहीपेक्षा

अधिक प्रमाणात सामाजिक जागृतीवर त्यांची भिस्त आहे.

*आपुलिया हिता जो असे जागता ।*

असे म्हणत त्यांनी समाजांतील विकृती, दांभिकता, अंधश्रद्धा, भोंदुगिरी यावर जोरदार आघात केले आहेत, तर सत्‌धर्म, सद्‌नीती, सदाचार याची मांडणी करीत शुद्ध आचारप्रणाली सांगितली आहे. ह्या जागृतीच्या अभंगातून मनाची उदारता, वृत्तीतला झुंझारपणा आणि निर्वैर बुद्धीबरोबर दुष्ट प्रवृत्तींवर प्रहार करण्याची कठोरताही प्रगटली आहे. तुकोबांचे असामान्य व्यक्तिमत्त्व आणि त्यातील विविध पैलू समजावून घेण्यासाठी त्यांची अभंगवाणी हाच खरा आधार आहे. ज्ञानेश्वर माऊलींनी म्हटले आहे–

*बिंब जरी बचके एवढे । परी प्रकाशा त्रैलोक्य थोकडे ।।*

सूर्यबिंब बचकेएवढे दिसत असले तरी त्याच्या प्रकाशाला त्रैलोक्य तोकडे पडते तशीच तुकोबारायांच्या अनुभवांची व्याप्ती आहे. तुकोबारायांची साधकदशा, त्यांचे स्वानुभूत्यद्‌गार, तुकोबारायांच्या अंतःकरणातील तळमळ, तुकाराम महाराजांचा उपदेश, नाममहिमा, विठ्ठल महिमा, सगुण विचार, तुकोबांचे लोककाव्य, साक्षात्कार विवरण, त्यांचे जागृतीचे विचार, व्यवहार नीतिचिंतन, त्यांनी मांडलेली रूपके, ब्रह्मैक्यभाव, समाजमनाचे उभे केलेले अचूक चित्रण, कीर्तन, भक्ती आणि विवेकाचा विचार, सामाजिक तत्त्वचिंतन या सर्वांतून तत्त्वज्ञ तुकोबा उभे राहात नाहीत तर लोकशिक्षक तुकोबाच उभे राहातात. त्यांच्या वाणीत समग्र लोकजीवनाचे प्रतिबिंब पडले आहे. त्यांची अभंगवाणी ही रसरसलेली अनुभवांची खाण आहे. आपल्याच वाणीचे स्वरूप सांगताना तेच म्हणतात–

*अनुभवे अंगे आला । ते या जगा देतसे ।*
*नव्हती हाततुके बोल । मूळ ओल अंतरीची ।।*

मला स्वतःला जे अनुभवाला आले ते या जगाला देत आहे. शुद्ध रसात भरलेले आणि कसाला उतरलेले हे शब्द वरवरचे पोकळ बोलणे नाही तर त्यात मुळात अंतरीची ओढ आहे. एका साध्या संसारी माणसाचा आत्मसाक्षात्कारी संत कसा झाला याचे तुकोबाराय हे उदाहरण आहे. आत्मानुभूती स्थिर झाली की प्रत्येक शब्दाला अधिकार प्राप्त होतो. तरीही तुकोबाराय स्वतःला अधिकारी समजत नाहीत. स्वतःला संतांच्या मार्गावरील सेवक समजतात. ह्या मार्गावरून चालण्यासाठी मार्ग दाखविणारे वाटाडे समजतात. ज्ञानेश्वर महाराजांनी ही वाट दाखविली. ज्ञानेश्वरीच्या आठव्या अध्यायात ते सांगतात–

*ऐशिया अनादिया दोन्ही वाटा ।*
*एकी उजु एकी अव्हाटा ।*
*म्हणौनि बुद्धीपूर्वक सुभटा ।*
*दाविलीया तुज ।*

अनादी काळापासून ह्या वाटा चालत आल्या आहेत. त्यापैकी एक सरळ तर दुसरी आडमार्गाची आहे. म्हणूनच तुला बुद्धिपूर्वक मी या वाटा दाखवितो आहे; कारण की यापैकी आपल्या हिताकरिता कोणता मार्ग योग्य आणि कोणता अयोग्य ह्याची जाणीव 'साच लटिके ओळखावे' ह्या भूमिकेतून जागृत होणे अवश्य आहे. तुकोबाराय म्हणतात– मी तर संतांचा मार्ग झाडण्यासाठी आलो आहे.

*आम्ही वैकुंठवासी । आलो याची कारणासी ।*
*बोलिले जे ऋषी । साच भावे वर्ताया ।*
*झाडू संतांचे मारग । आडरानी भरले जग...*

संत जरी दोन भिन्न मार्ग अनादी काळापासून चालत असले आणि उजु म्हणजे योग्य असणारा मार्ग जरी दाखविला तरी तोही मार्ग मलिन झाला होता. वेदांनी, उपनिषदांनी, तत्त्वचिंतकांनी, ऋषिमुनींनी ती उज्ज्वल वाट दाखविली होती. ती वाट उज्ज्वल आहे. तीच सदाचार, सत्‌विचार, आणि विवेक तत्त्वाने भरलेली आहे हे ज्ञात असूनही

*अर्थे लोपली पुराणे । नाश केला शब्दज्ञाने ।*
*विषयलोभी मने । साधने बुडविली ।*

वेदांचा अर्थ न कळल्याने, शब्दज्ञानाच्याच मार्गे लागल्याने, तार्किकतेलाच अकारण महत्त्व दिल्याने, मार्गाचे ज्ञान असणाऱ्यांच्या स्वार्थी बुद्धीने, मार्ग जाणणाऱ्यांच्या अहंकाराने, त्यांच्यातील कर्मठपणामुळे त्यांनीच हा 'उजु' मार्ग मलिन केला आणि वाटा पुसू लागल्या. चांगली वाट कोणती आणि वाईट कोणती हेच दिसेनासे झाले.

समाजाची ही स्थिती दर्शविणारी एक सुंदर कथा नुकतीच ऐकण्यात आली. सत् आणि असत् ह्या दोन्ही बहिणी-बहिणी. एकदा बरोबर नदीवर स्नानाला गेल्या. 'सत्'ला

समाज मान देतो; मला देत नाही याची असूया नित्य 'असत्'च्या मनात असायची. म्हणून दोघी अंघोळ करीत असताना 'असत्' नदीतून पटकन् बाहेर आली आणि नदीच्या काठावर ठेवलेली 'सत्'ची वस्त्रे नेसून धावत धावत गावात गेली. कालांतराने 'सत्' नदीच्या बाहेर आली पण आपली वस्त्रे 'असत्' घालून गेली आहे म्हणून पुन्हा पाण्यात गेली आणि गारठून मेली. आता 'असत्' 'सत्' होऊन समाजात अभिमानाने वावरू लागली. असत्ने 'सत्'ची वस्त्रे घालून 'सत्' म्हणून मिरविणे हे जितके धोकादायक तितकेच असत्लाच 'सत्' म्हणणे हे अधिक धोकादायक. समाजामध्ये आजही अशीच अवस्था आहे. 'असत्'च 'सत्' होऊन वावरते आहे आणि असत्लाच 'सत्' म्हणून गौरविले जात आहे. ह्या मळलेल्या वाटा आता पुन्हा स्वच्छ करणे गरजेचे आहे. समाजसुधारण्याचे तत्त्वचिंतकाचे, प्रबोधनकाराचे काम ते आहे.तुकोबाराय म्हणतात–

*उजळावया आलो वाटा । खरा खोटा निवाडा ॥*
*तुका म्हणे नये आम्हा । पुढे कामा गबाळ ॥*

मलिन झालेल्या वाटांवरील धूळ काढून त्या शुद्ध वाटा पुन्हा उजळून काढण्यासाठी मी आलो आहे. आता गबाळ गोष्टी खपवून घेतल्या जाणार नाहीत. मी तत्त्ववेत्ता आहे, मी तत्त्वचिंतक आहे, मी उपदेशक आहे, माझे हे विचारचिंतन आहे असे तुकोबाराय सांगत नाहीत. तर ज्या वाटा अनादि कालापासून शुद्ध, स्वच्छ, रसाळ, सुलभ, विवेकी, सदाचारी आणि ध्येयाप्रत नेणाऱ्या होत्या, त्याच वाटा मध्यंतरी काही कारणाने मलिन झाल्या. योग्य काय आणि अयोग्य काय हे समजेनासे झाले. सामाजिक विवेक संपुष्टात आला. व्यक्ती म्हणून खऱ्या खोट्याचा निवाडा करून शुद्ध तत्त्वाच्या वाटा उजळण्यासाठी मी येथे आलो आहे. तुकोबांची ही भूमिका प्रपंच आणि परमार्थ, व्यक्ती आणि समाज, बाह्यरंग आणि अंतरंग, आधुनिकता आणि प्राचीनता या सर्वांना एकत्रित विचार करून मानवी मनाला आणि सामाजिक जीवनाला समृद्धीकडे नेणारी अशी आहे.

❖❖❖

**डॉ. रामचंद्र देखणे**
सी ३/४ डीएसके चिंतामणी, ५१३ शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.

# संत तुकाराम :
# एक वास्तववादी आकलन



□ डॉ. आनंद यादव

संत वाङ्मयाच्या तत्त्वज्ञानाचा पाया संत ज्ञानेश्वरांनी घातला आणि त्यावर भक्कम स्वरूपाचे वाङ्मय मंदिर उभे केले. त्यानंतर त्यावर संत तुकारामांनी कलश चढविला. ऐतिहासिक दृष्ट्या मध्ययुगात गतानुगनिकतेमुळे धर्मविषयी जनसामान्यांच्या मनात विकृत कल्पना रूढ झाल्या होत्या. स्वतः धर्मानुसार आचरण करून इतर वर्णजातींना धर्मप्रवण करणारा ब्राह्मण वर्गच षड्रिपूंच्या आहारी गेला आणि कर्मकांडाला प्राधान्य देऊन स्वतःच धर्मभ्रष्ट झाला. पोटासाठी धर्माला उथळ, विकृत करून जगू लागला ... तुकोबांच्या काळात म्हणजे सतराव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रात कहर झाला होता. ... या पार्श्वभूमीवर संत तुकारामांचे जीवन आणि वाङ्मय कार्य आकाराला आलेले दिसते. तुकोबांचे हे कार्य चिरस्थायी स्वरूपाचे आहे. म्हणून ते आजही, आधुनिक काळात एकविसाव्या शतकात, केवळ भौतिक मूल्ये मानणाऱ्या भोगासक्त युगात समजून घेणे आवश्यक आहे. कारण ते पूर्ण मानवतावादी आणि प्रबोधनकारक आहे.

याचे कारण भारतीय तत्त्वज्ञान, संस्कृती आणि समाज यांचा मौलिक मेळ घालून संतांनी आपले संतकार्य केले आहे. ते आजही महत्त्वाचे आहे. मात्र ते झाडून, पाखडून, निवडून स्वीकारण्याची गरज आहे. कारण संतवाङ्मय हे प्रामुख्याने मध्ययुगात निर्माण झालेले आहे. त्यामुळे संतांचे जीवन हे त्यावेळच्या रूढ कल्पनांनी आणि समजुतींनी काहीसे प्रभावित झाल्यासारखे आहे. उदाहरणार्थ पुनर्जन्माची कल्पना, मनाच्या आध्यात्मिक तरल आणि उच्च पातळीवरच्या जाणिवा, स्वप्ने, दृष्टान्त, चमत्कार, तथाकथित साक्षात्कार सर्वार्थांनी खरे मानणे; हे आजच्या तथाकथित वास्तववादी, भौतिकवादी, तर्कप्रधान, विज्ञाननिष्ठ दृष्टीला पटतीलच असे नाही. त्यासाठी त्या घटना एका जाणकारीने, मानसशास्त्रीय दृष्टीने, सांस्कृतिक संदर्भाने, अभ्यासपूर्वक आणि मध्ययुगीन संदर्भाने समजून घ्याव्या लागतील.

ज्या मध्ययुगीन काळात संतवाङ्मय निर्माण झाले त्यावेळच्या 'साहित्य संकल्पना'ही आपण लक्षात ठेवण्याची गरज आहे. उदाहरणार्थ रसपरिपोषासाठी 'अतिशयोक्ती' हा वाङ्मयीन अलंकार सहजपणे वापरला जात असे. ...आधुनिक दृष्टिकोणाला हे भान ठेवावे लागते. तरच त्यातील वास्तव आपल्या हाती नीटपणे लागते. नाहीतर त्यावेळच्या साहित्याविषयी किंवा त्याकाळातील लिखित चरित्र - घटनांविषयी गैरसमज होण्याची शक्यता असते.

आज सर्वसामान्य माणूस तुकोबांचे चरित्र सामान्यतः कीर्तन, प्रवचन, निरूपण यांच्या द्वारा समजून घेत असतो किंवा त्याला ते त्या माध्यमातूनच समजलेले असते. पण कीर्तनकार, प्रवचनकार, निरूपणकार बुवा आपल्या कार्यक्रमांत रंग भरण्यासाठी आणि समोर बसलेल्या भोळ्याभाबड्या, अज्ञ, निरक्षर, अडाणी श्रोतृवर्गाला गुंगवण्यासाठी, चकित करण्यासाठी, मंत्रमुग्ध करून एका जागी खिळवून ठेवण्यासाठी अनेक वेळा आपल्या कीर्तन-प्रवचनात भडक, अतिशयोक्त, काल्पनिक, ऐनवेळी



अनुक्रमणिका

सुचलेल्या कल्पना किंवा अतिशयोक्त प्रसंग घुसडून देतात आणि बाजी मारून नेतात.. भाबड्या श्रोतृवृंदाला ते खरेच वाटतात. आणि मग त्यातूनच संतचरित्रे लिखित स्वरूपात तयार झालेली असतात.

याशिवाय हिंदुधर्मात - संस्कृतीमध्ये प्राचीन काळापासून काही कल्पना रूढ झालेल्या आहेत. मध्ययुगात तर त्या अधिकच वज्रलेप झालेल्या होत्या. उदाहरणार्थ निरनिराळ्या देवदेवता, स्वर्गलोक, देवलोक, कैलास, वैकुंठ, पुनर्जन्म, पापपुण्यानुसार नंतरच्या जन्मांचे स्वरूप इत्यादी गोष्टी प्रस्तुत संदर्भात सांगता येतील. या गोष्टींचा पगडा सर्वच हिंदू समाजावर आणि संस्कृतीवर मध्ययुगात विशेष करून होता. त्यातून पुष्कळच कर्मकांड त्यावेळच्या समाजात माजले होते... आधुनिक काळातही ह्या गतानुगतिक कल्पनांचा पगडा सर्वसामान्य, अर्धशिक्षित, भोळ्याभाबड्या मनावर असतो. त्यातूनच अंधश्रद्धा निर्माण होतात, असे सर्वसामान्यपणे म्हणता येईल.

आधुनिक युगातील सुशिक्षित, सुसंस्कृत, जाणकार आणि विचारी असलेल्या माणसावरच या सर्वांचा परिणाम पुष्कळवेळा विपरीत झालेला असतो... त्यामुळे तो माणूस सर्वच मध्ययुगीन वाङ्मय 'थोतांड' मानून संतांना केवळ 'वळकुटे' समजून तिकडं ढुंकूनही पाहत नाही... स्वत:ला आधुनिक, प्रतिष्ठित, 'अप टू डेट' विचारवंत समजतो. केवळ भौतिकवाद, चंगळवाद यांनाच तो प्रमाण मानून मजा मारत असतो. मिळेल तेवढे, मिळेल तसे भोगून घेत असतो. आत्मकेंद्री होऊन जगत असतो. वासना-विकारांची तृप्ती करण्यातच त्याला धन्यता वाटते. ... माणसाला जन्म एकदाच मिळतो असं जाणून भोगासक्त होतो.

अर्थात् सगळेच लोक असे असतात, असं नाही. काही गंभीर प्रकृतीचेही असतात. पण त्यांचा संबंध आपल्या चांगल्या परंपरांशी क्वचितच असतो. जीवनविषयक भारतीय तत्त्वज्ञान, मूळ धर्मकल्पना, सांस्कृतिक वारसा यांच्याशी त्यांचा संबंध जाणीवपूर्वक क्वचितच आलेला असतो. ते लोक प्रामुख्याने विज्ञानाच्या, उद्योगधंद्यांच्या, कारखानदारीच्या, शासनव्यवस्थेच्या, वाणिज्य व्यवस्थेच्या किंवा तत्सम क्षेत्रांत चरितार्थाचे साधन म्हणून कार्य करीत असतात. प्रामुख्याने त्यांचे संबंध त्या त्या क्षेत्रांतील व्यक्तींशीच असतात. त्यातूनच त्यांची विशिष्ट दैनंदिन जगण्याची शैली घडत असते. जगण्याच्या मूल्यकल्पनाही त्यांतून आकाराला आलेल्या असतात.

...अशी मंडळी पुष्कळवेळा पन्नाशी ओलांडल्यावर किंवा निवृत्तीच्या काळात संतवाङ्मयाकडे एक विरंगुळा म्हणून वळण्याचा प्रयत्न करत असतात. त्यांतून संतवाङ्मयाचे केवळ 'पारायण' करण्याची प्रवृत्ती विशेष वाढते. अशा व्यक्ती संत वाङ्मयाच्या मूळ गाभ्याला क्वचितच भिडतात; असे दिसते.

आधुनिक समाजाची ही सर्वसाधारण स्थितिगती जाणूनच मला एक साहित्यिक या नात्याने असे वाटू लागले की अशा प्रकारच्या शिक्षित समाजाला संत, संतवाङ्मय, संतजीवन आणि संतकार्य नीटपणे, त्याला मानवेल अशा आधुनिक वाङ्मयाच्या साहित्य प्रकारांच्या द्वारा किंवा आकृतीबंधाच्या द्वारा समजून देण्याची गरज आहे. तसे झाले तर या समाजाला; संतवाङ्मयाच्या अंतरंगात शिरण्याची, ते समजून घेण्याची प्रेरणा मिळू शकेल. असे वाटल्यामुळेच मी 'लोकसखा ज्ञानेश्वर' आणि 'संतसूर्य तुकाराम' या कादंबऱ्या लिहिण्यास धजलो, त्यांची निर्मिती करण्यासाठी धडपडलो.

प्रस्तुतची 'संत सूर्य तुकाराम' ही कादंबरी लिहिताना आधुनिकतेच्या दृष्टीने मला काय काय करावे लागले आणि कोणती पथ्ये पाळावी लागली; तेवढेच इथे संक्षिप्त रूपात सांगत आहे—

तुकोबा त्याकाळातील जनसामान्य, चार जणांसारखे प्रापंचिक होते. वाण सामानाचे दुकान, व्यापार, महाजनकी, सावकारी, पंधरा बिघे जमिनीचे शेतकरी, संसारात तीन भाऊ, त्यांच्या बायका-मुले यांच्या एकत्र कुटुंबात ते वावरणारे होते... ते तथाकथित चमत्कार वगैरे करणारे, बुवा, महाराज वगैरे कोणी नव्हते.

वस्तुस्थिती अशी असल्यामुळे त्यांच्या अनेक लिखित चरित्रांत आणि त्यांच्याविषयीच्या कीर्तन-प्रवचनात इतरांनी नंतर घुसडलेले सर्व चमत्कार व अतिशयोक्तीपूर्ण घटना एक तर काढून टाकल्या आहेत किंवा त्या वास्तव पातळीवर आणून आवश्यक तो त्यांचा शक्यतेच्या पातळीवर विचार केलेला आहे, आणि चमत्कार काढून



अनुक्रमणिका

टाकलेले आहेत. उदा. १) एका बाईचे मृत मूल तुकोबांनी हस्तस्पर्श करून जिवंत केले. २) विठ्ठलाने 'शिवाजीचे रूप' घेतले आणि खऱ्या शिवाजीची मोगलांच्या हल्ल्यापासून सुटका केली. ३) रामेश्वरभटाच्या शरीराचा दाह त्यांच्या शरीराला तुकोबांनी हस्तस्पर्श करून नाहीसा केला. ४) ज्वारीची राखण करताना त्यांनी केलेला चमत्कार इत्यादी घटना काढून टाकून तुकोबांचे जीवन वास्तवाच्या पातळीवर आणले आहे.

तसेच वह्यांच्या जलदिव्यासारखे, 'सदेह वैकुंठाला गेले' यासारख्या घटनांतील अतिशयोक्ती आणि चमत्कार काढून टाकले आहेत आणि त्यांतील मूळ घटित वास्तवाचा शोध घेऊन मगच कादंबरी लेखन केले आहे.

तुकोबांचा जन्म शके १५३० (इ.स. १६०८) साली झाला असे तुकोबांच्या जीवनाचा व वाङ्-मयाचा अभ्यास करणाऱ्या बहुसंख्य चरित्रकारांनी, विचारवंतांनी म्हटले आहे. तसेच तुकोबांचा मृत्यू शके १५७१ (इ.स. मार्च १६५०) साली झाला, असे म्हटलेले आहे. पण नंतरच्या काळात देहू-पंढरपूर येथील तुकोबांच्या वंशावळीची लिखित नोंद उपलब्ध झाली आणि तिच्यामध्ये तुकोबांचा जन्म शके १५२० (इ.स. १५९८) साली झाला असल्याचे नोंदवले आहे. मात्र त्यांच्या मृत्यूच्या सालाविषयी वा दिनांकाविषयी मतभेद दिसत नाहीत. असे असूनसुद्धाआजही अनेकजण तुकोबांचा जन्म शके १५३० (इ.स. १६०८) सालीच झाला, असे मानून तुकोबांविषयीचे लेखन करताना दिसतात.

स्वतः मी माझे कादंबरीलेखन, 'तुकोबांचा जन्म शके १५२० (इ.स. १५९८) साली झाला.' हे मत स्वीकारून केलेले आहे. याचे कारण असे की तुकोबांच्या मानसिक जीवनाचा आलेख त्यांच्या 'गाथे'चा अथपासून इतिपर्यंत सलग अभ्यास केल्यावर आणि त्यावर सर्वांगांनी चिंतन केल्यावर तुकोबांचे एकूण आयुर्मान निदान पन्नास वर्षांचे असले पाहिजे; असे निष्कर्ष निघतो. त्यामुळे त्यांचा जन्म शके १५२० (इ.स. १५९८) सालीच झाला, असे गृहीत धरणे आवश्यक वाटते. शके १५३० (इ.स. १६०८) हे साल गृहीत धरले तर त्यांचे एकूण आयुर्मान चाळीस वर्षांच्या आसपासचेच होते. तुकोबांच्या घराण्याची, उद्योगव्यवसायाची परंपरा, त्यांची कौटुंबिक स्थितिगती, त्यांच्यावर आलेल्या कौटुंबिक, आर्थिक आपत्ती, हळूहळू या सर्वांतून स्वतःच विचार करून अलग किंवा तटस्थ होणे, जनसंपर्क कमी करणे, एकान्ताची ओढ लागणे, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ यांच्या संतवाङ्मयाचा स्वतंत्रपणे अभ्यास करणे, त्यावर चिंतन करणे, एकूणच भारतीय प्राचीन तत्त्वज्ञान, संस्कृती, धर्म इत्यादींचे अभ्यासपूर्वक चिंतन करणे,भागवतधर्माचे काहीसे वेगळे तत्त्वज्ञान समजून घेणे, ज्ञान, कर्म, भक्ती, योग यांसारख्या तात्त्विक जीवनमार्गाचा अभ्यास करणे, 'भक्ती'चे वेगळेपण जाणणे, तिची साधना करणे, भौतिकातून अध्यात्माकडे अभ्यासपूर्वक प्रवास करणे, 'पराविद्या' आत्मसात करणे, आत्मविश्वासपूर्वक स्वतःचे आकलन अभंगबद्ध करणे इत्यादी बाबींचा त्यांचा आवाका लक्षात घेता त्यांचे एकूण आयुर्मान पन्नासएक वर्षांचे असणे अगदी स्वाभाविक आणि सुसंगत वाटते. केवळ वयाच्या चाळीस वर्षांत हे आत्मसात झाले, असेल असे मानसशास्त्रीय दृष्ट्याही वाटत नाही.

तुकोबांच्या तथाकथित वैकुंठ गमनाविषयीही अनेक विचारवंतांनी आणि अभ्यासकांनी आपआपली मते व्यक्त केली आहेत. त्यांत तुकोबा मरण पावले, गुप्त झाले, जलसमाधी घेतली, वैकुंठाला गेले, घरीच मरण पावले, त्यांचा खून झाला, वाराणसीला गेले, अशी विविध मते अनेक मंडळींनी व्यक्त केली आहेत.

त्यांचा तारतम्याने मी अभ्यास केला. शेवटी तुकोबांचे बंधू 'कान्होबा' आणि तुकोबांची शिष्या 'बहिणाई' यांनी त्या त्या वेळीच 'तुकोबा अचानक गुप्त झाले', 'तुकोबा मृत्यू पावले' असे नोंदवून ठेवले आहे. ही तुकोबांना समकालीन अशी मंडळी होती. त्यांचेच ते मत प्रमाण मानावे लागते. बाकीच्या मतांत चमत्कार, उदात्तीकरण, अवास्तवीकरण, अंधःश्रद्धा, मृत्यूविषयीचे श्रद्धाभाव, पूर्वग्रहदूषितता इत्यादी स्वरूपांचे भाव दिसून येतात. 'वैकुंठास जाणे' या शब्दप्रयोगाचा अर्थ 'मरण पावणे' असाच परंपरेने पूर्वीपासून चालत आलेला आहे.

तुकोबांनाही त्याकाळच्या समजुतींनुसार 'परमेश्वरात एकजीव होऊन जावे' असे वाटत होते. त्यानुसार त्यांनी त्यावेळच्या प्रथेनुसार, जाणीवपूर्वक परमेश्वराशी एकरूप होण्याची इच्छा धरून जलसमाधी घेतली असण्याची दाट शक्यता आहे... योगविद्येतील प्राणायामाच्याद्वारे श्वास



अनुक्रमणिका

कोंडून ठेवून 'परमेश्वराशी एकात्म होण्याची उत्कट इच्छा मनी धरून जलसमाधी घेतली तर आपणास त्या इच्छेनुसार मुक्ती मिळते आणि परमब्रह्मात, परमात्म्यात आपला 'आत्मा' विलीन होतो आणि आपणास पुनर्जन्म मिळत नाही; जन्ममरणाचे फेरे आपण चुकवू शकतो; अशी समजूत त्या काळात होती... त्या नुसार तुकोबांनी केले असण्याची दाट शक्यता त्यांच्या अनेक अभंगांवरूनही जाणवते. त्याच अर्थाने ते 'वैकुंठास गेलेले' दिसतात.

मध्ययुगात पुनर्जन्माची कल्पना रूढ होती. योगी, ज्ञानी, भक्त, संत यांना 'पराविद्येच्या' म्हणजे अध्यात्म विद्येच्या द्वारा 'पराप्राप्ती' म्हणजे परमतत्त्वात (परमेश्वरात) आत्मतत्त्वाचे (आपल्या जीवनात्म्याचे) संमिलन किंवा सान्निध्य साधता येते; परमात्म्यात जीवात्मा विलीन होऊन जातो. अशी दृढ कल्पना होती. या शाश्वत सान्निध्यामुळे किंवा एकात्मतेमुळे त्या व्यक्तीच्या 'आत्म्याला' पुनर्जन्म घ्यावा लागत नाही. किंवा त्याला पुनर्जन्म मिळत नाही; असे समजले जात होते. ...या अर्थानेही आपल्या देवलोकांत तुकोबांना नेण्यासाठी प्रत्यक्ष परमेश्वर गरुडावरून आले होते आणि ते तुकोबांना देवलोकात कायमचे घेऊन गेले, असे लक्ष्यार्थाने म्हणता येईल. आधुनिक दृष्टीनुसार असे म्हणता येईल की, तुकोबांना असे वाटत होते की, आपल्या जीवनातील अपेक्षित कार्यसिद्धी झालेली आहे; म्हणून आपल्या जीवनास सर्वार्थाने आता पूर्णविराम देण्यास हरकत नाही; म्हणून तो देण्यासाठी ते गुप्त झाले आणि त्यांनी आपण होऊन तो पूर्णविराम दिला. मात्र तो कुठे, कसा दिला याचे पुरावे निश्चित स्वरूपात सापडत नाहीत. म्हणूनच की काय, त्यांच्या मृत्यूविषयी अनेक कल्पना आणि मते रूढ झालेली दिसतात.

❖❖❖

('संतसूर्य तुकाराम'– मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे लौकरच प्रसिद्ध करीत असलेल्या कादंबरीच्या प्रस्तावनेमधून.)

आनंद यादव
'भूमी' ५ कलानगर, पुणे-सातारा रस्ता,
धनकवडी, पुणे ४११ ०४३.





अनुक्रमणिका

# 'ज्ञानबा-तुकाराम' एक मुक्त चिंतन.



□ शांतिलाल भंडारी

पुष्पदंतांचं महापुराण, मुकुंदराजांचा विवेक सिंधू, चक्रधरांचं लीळाचरित्र ही जरी ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरीची मोठी भावंडं असली तरी जनमानसावर ज्ञानेश्वरीनं जी अविरत अधिसत्ता सातशे वर्षांहून अधिक काळ अखंड गाजवली त्या वारशाने आणि मराठी अस्मितेने 'पुढे चालती ज्ञानेश्वर' असेच गुणगान सार्थ अभिमानाने व अपार भक्तिभावाने गायिले आहे. म्हणूनच की काय, *'येथ नवल काय म्हणशी । मराठीच आम्ही बोलली ऐशी ।। झळकले नाना रंग आकाशी । साहित्याच्या ।।'* ही झळाळी जशी ज्ञानोबांच्या ज्ञानेश्वरीला तशीच ती तुकोबांच्या गाथेला.

केवळ मराठी साहित्याच्या आकाशी नव्हे तर अवघ्या मराठी समाजाच्या अंगणीही नानारंग झळकले आणि हे नानारंग एक होऊन सूर्य किरणांप्रमाणे तळपले. म्हणून तर 'कुळजाती वर्णसारे सारेचि मानुनी निष्फळ' आषाढी एकादशीला महाराष्ट्रातलाच नव्हे, तर महाराष्ट्राबाहेरचाही 'अवघाचि विठुजन चंद्रभागे तटी ठोके तळ !'

विशेष म्हणजे, ज्ञानेश्वर माऊली ब्राह्मण असूनही ब्राह्मण श्रेष्ठांकडून तिरस्कारल्या व छळल्या गेलेल्या या ब्राह्मणशिरोमणी संतश्रेष्ठाचे नेतृत्व अन्य सर्वत्र ब्राह्मणेतर संतांनी आदराने आणि आत्मीयतेने स्वीकारले, म्हणूनच यांच्या दिंड्या पताका व पालख्या ज्ञानोबा माऊलीच्या पालखीमागून चालत पंढरपुरास वर्षानुवर्षे जात राहतात.

*'होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले हे वैष्णव वीर रे।।*
*तुका म्हणे सोपी केली पायवाट । उतरावया भवसागर रे ।।*

संत शिरोमणी तुकोबारायांनी संसार सागर पार करून जाण्यासाठी पायवाट सोपी केल्याचे सांगितले आहे. ही 'पायवाट' पंढरी मार्गे जाते. ज्ञानोबा माऊली आणि त्यांच्या असंख्य अनुयायांची मांदियाळी ज्या पायवाटेने गेली ती पायवाट मळून सोपी झाली असं काही या संत शिरोमणीला सुचवायचं आहे. म्हणून तर गेली अनेक वर्षे या वाटेवर 'ज्ञानोबा तुकोबां'चा जयजयकार वैष्णवांच्या कडून, अर्थात विठुजनांकडून मोठ्या जल्लोषात होत राहतो आणि या गजराने अवघे आभाळ दुमदुमते.' 'माझ्या जीवीची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी ।।' ज्ञानियाच्या अंतरीची ही उत्कटता, आणि 'जाईन गे माये तया पंढरपुरा। भेटेन माहेरा आपुलिया । ही तुकाराम महाराजांच्या अंतरीची उत्सुकता यांचा सुरेख, सुरेल संगम होऊन जेव्हा विठुजनांच्या भजनांतून मुखरित होते, तेव्हा या दुमदुमण्याला आणखी स्फुरण चढते. 'जाता पंढरी सुख वाटे जिवा' ते यासाठीच !

'ज्ञानदेवे रचिला पाया, तुका झालासे कळस' असं बहिणाबाई म्हणून गेली, ते उगाच कसे ! मराठीजनांनी हे शिरोधार्य मानल्याची साक्ष दरवर्षी फुलत जाणारी पंढरीची आषाढी वारी देते ! आणि 'मागे पुढे दाटे ज्ञानाचा उजेड' याची साक्ष देते.

ज्ञानोबाराया आणि तुकोबाराया या संतांच्या पालख्या आळंदी व देहू या वेगवेगळ्या ठिकाणांहून निघत असल्यातरी मध्ये वाटेवर, पुण्यनगरीत त्या एकमेकींना जिवाभावी भेटतात. पुढे वेगवेगळ्या दिशेनं या मार्गस्थ होत

असल्या तरी विठोबा माऊलीच्या पंढरीत या दोघी जिवलग्या एकमेकींना गळामिठी घालतात. मग कोण पाया, कोण कळस; कोण पुढं, कोण मागं याचं भान वारकऱ्यांना राहात नाही. भावभक्तीच्या या उमाळ्यात भक्ताभक्तामधलं अंतर देखील सरत असतं. या सर्वांच्या पुढे यांचा पांडुरंग उभा ठाकल्याने यांच्या लेखी अंतर उरत नसतं. यांचा देव तर यांच्या अंतरी एव्हाना वस्तीलाच आलेला असतो ! पंढरीनाथाचा हा भक्तवास आणि भाविक भक्तांचा पंढरीवास अंतर नुरल्याची व रास जुळल्याची सुखद जाणीव देतो ! जनाबाई म्हणाली तसा हा भक्तसोहळा, आणि अनेक साहित्यकार म्हणतात, तसा हा भक्तिसोहळा देखील! देवकीनंदन गोपालाचा !

संसारातील दुःखांचा विसर पडावा, कष्टांचा परिहार व्हावा, आजवर जे मिळालं त्यासाठी उतराई व्हावं, सुखासमाधानासाठी करुणा भाकावी म्हणून अठरा पगड जाती अठरा दिवस घरदार विसरून तनानं, मनानं पंढरीकडे धाव घेतात. वाखरीपाशी गोळा होणारा हा माणसांचा लोंढा चंद्रभागेला 'भिवरेच्या तीरी' भेटायला व लाडक्या विठूराऊला कवटाळायला अधीर झालेला असतो हे पाहून लक्षावधी भाविकांचीच नव्हे, तर साहित्यिकांसारख्या स्पंदनशील कलावंतांची अंतःकरणे भावविभोर होऊन उचंबळून न येतील तरच आश्चर्य ! संतकवींच्या मनातली, हृदयातली अमृताची कारंजी थुईथुई उसळी घेतात.

साहित्यातील नवरसातला भक्ती हा एक रस. संतजनांच्या, भक्तजनांच्या लेखीटाकी हा गोपालाच्या गोकुळातला गोरस ज्ञानेश्वर माऊलींच्या शब्दांत हा दुग्धरस अमृताने पैजा जिंकणारा. ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरीतून, तुकारामांच्या गाथेतून, एकनाथांच्या भागवतातून, आणि आणखी कुणाकुणाच्या साहित्यकृतींतून ओथंबून वाहणारा. या वाहत्या रसौघात मराठीजन न्हाऊन निघाले आणि 'पुढे चालती ज्ञानेश्वर' या स्तुतिघोषात संतजनांच्या मागुती चालत राहिले. साहित्यिकांच्या दिंड्या रसरसून या यात्रेत सहभागी झाल्या. यांच्याकडून झालेल्या नवरसांच्या शिंपणीने मराठी मातीचा गंध दरवळत राहिला !

*'पाहा पां मालतीचे कले। घ्राणासि वांटले कीर परिमळें।*
*परि वरचिली बरवा काइ डोले। धावती नोहोंति ।।१।।*

मालती फुलांच्या कळ्या सुगंधाने नाकाला खचित आल्हाद देतात, पण (म्हणून) त्यांचं बाह्य सौंदर्य डोळ्यांना सुखावत नाहीत काय ?

*'नाना गुंफिली कां मोकळी । उणी न्हवती परिमळी ।*
*वसंतगमिचि वाटोळी । मोगरी जैसि ।।'*

... वसंत ऋतूच्या आगमन कालात मोगरीचे भरगच्च गेंद माळले काय किंवा मोकळे राहिले काय सुगंधात ते उणे पडत नाहीत. अशा सुरम्य सुगंधी मालतीमोगरीपेक्षा परिमलातच नव्हे तर सौष्ठवातही उणी न पडणारी, वसंतासह सहाही ऋतूत दरवळणारी, कर्ण नेत्र आदि अवयवांना रिझवणारी, साहित्यालंकारांनी सजली धजलेली, नवरसांत आणि विशेषत्वाने शांत रसात न्हाऊन निघालेली, रसास्वादाने मोहरलेली, भारलेली. परिमलातच केवळ नव्हे तर अन्य कशातही उणी न पडणारी, सरस्वती आणि सारस्वत यांच्याकडून अखंड मानवंदना घेणारी ही श्री ज्ञानेश्वरांची किती कौतुके ! जितुके बोलावे वर्षावे तितुका गंध मराठी मातीचा आसमंत व्यापून राहील. कारण भगवद्गीतेत आहे ते सर्व ज्ञानगीतेत आहे, आणि भगवद्गीतेत नाही तेही ज्ञानगीतेत आहे इतका ज्ञानेश्वरीचा विस्तृत वाग्विलास आहे.

संत साहित्य कालबाह्य झालं असं नव्या पिढीतल्या तरुण तरुणींना आणि तशातूनही विद्रोही साहित्यकारांना वाटतं. स्वातंत्र्यपूर्व काळात माध्यमिक विद्यालयांतील व महाविद्यालयांतील अध्यापक-प्राध्यापक या तथाकथित पंतोजींनी व गुरुजींनी संत वाङ्मयावर ठरीव चाकोरीतून व ठरीव ठशातून चर्वितचर्वण केलेलं व घासून गुळगुळित व गुळमुळित झालेलं निरूपणवजा भाष्य व भक्तजनांकडून झालेली पाठांतरित पारायणे या अरुचीला व अप्रियतेला कारणीभूत झाली असं थोडं धाडसानं म्हणणं भाग पडावं. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या त्रैवर्णिकांनाच तेवढा वेदाधिकार आहे, वेदाचे वाचन करणे व त्यातील क्रियाकर्मे करणे याचे स्वातंत्र्य आहे, असा वेदांनी प्रतिपादलेला विषमभाव श्री ज्ञानदेवांना मान्य नव्हता. म्हणूनच ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायात ज्ञानोबा माऊली परखडपणे सांगतात. 'वेद सर्व दृष्टींनी संपन्न आहेत. पण तीनच वर्णांना तो वेदाधिकार देतो हा त्याचा कृपणपणा आहे.' असे सांगून ज्ञानदेवांनी चारी वर्णांसाठी गीता अवतरली असे सांगितले आहे. पण गीतेला हा साक्षात्कार कसा व कोठून झाला; याचे स्फूर्तिस्थान व

प्रेरणास्थान नेमके कोठे आहे, गीतेतला आधार घेऊन महाप्रवाही झालेल्या ज्ञानेश्वरीवर तत्पूर्वीच्या विचारधारांचा काही परिणाम झाला आहे काय, व प्रभाव पडला की काय इकडे साहित्यकारांचे व भाष्यकारांचे विशेषत्वाने लक्ष गेलेले दिसत नाही. स्वातंत्र्यानंतर मराठी भाषेचा साठोत्तरी काळात जो विकास झाला व जी गोडी निर्माण झाली यांचे श्रेय दलित आत्मकथनांना व स्त्री-आत्मकथनांना विशेषत्वाने द्यावे लागेल. जे पिढ्यान् पिढ्या, वर्षोन्वर्षे सोसलं, भोगलं ते या आत्मकथनांनी व आत्मकथाकारांनी रसरसून, समरसून आणि पिळवटून सांगितलं. अंतःकरणातल्या उफाळत्या उमाळ्यांतून व हृदयांतील विलक्षण तीव्र वेदनांतून हे पाझरलं म्हणून अनेक वाचकांच्या हृदयाला ते थेट जाऊन भिडलं. नव्या पिढीतल्या तरुण तरुणींना आणि विद्रोही साहित्यकारांना व सर्वसाधारण जनांना मनापासून भावलं म्हणून त्यांनी ते प्रेमानं आणि आत्मीयतेनं डोक्यावर घेतलं, छातीशी कवटाळलं. संत वाङ्मयात असं काही आणि इतक्या तीव्रतेनं त्यांना त्यांच्या कल्पनेप्रमाणे व अपेक्षेप्रमाणे गवसलं नाही. यांच्यातील काहींच्या मते फुले-आंबेडकर यांचं यात दर्शन घडत नाही. वेदवाङ्मयाशी तर यांचा उभा दावा! म्हणूनच बाबूराव बागुलांसारखा विद्रोही साहित्याचा जनक वेदांना ईश्वरप्रणीत न मानता 'माणसा, वेदाआधी तू होतास' असं ठासून ठणकावून सांगतो.

ब्राह्मणश्रेष्ठांकडून गांजल्या गेलेल्या आणि 'संन्याशाची मुले' म्हणून त्यांच्याकडून चिथावल्या गेलेल्या समाजाच्या तिरस्काराने पोळलेल्या निवृत्ती, ज्ञानोबा, सोपान, मुक्ताबाई या भावंडांना कोवळ्या वयात काही कमी सोसावं लागलं नाही. त्यांच्या या छळाचं प्रतिबिंब ज्ञानेश्वरीत कुठं उमटलेलं आहे की नाही या दृष्टीने ज्ञानेश्वरीचा संशोधकांकडून व समीक्षकांकडून, भाष्यकारांकडून व साहित्यकारांकडून नीटनेटका आणि प्रकर्षाने अभ्यास झालेला दिसत नाही. ज्ञानेश्वरी तशी नवरसांनी व साहित्यालंकारांनी रसरसलेली व ओथंबलेली आहे. वैवाहिक जीवनाचा प्रत्यक्ष अनुभव गाठीशी नसतानाही ज्ञानदेवांकडून अधूनमधून शृंगार रसाचा ज्ञानेश्वरीत शिडकाव झालेला आहे. तरीही ज्ञानेश्वरीचा प्रधान रस शांत रस असल्याने उच्च वर्णीयांकडून व उच्चभ्रूंकडून अधिक तर गौरवल्या गेलेल्या ज्ञानेश्वरीत विद्रोहाचे ठसठशीत व ढळढळीत दर्शन घडत नसल्याचे काहींना वाटते. चार भावंडांच्या वाट्याला आलेलं उपेक्षित व 'दलितपद दलित' जीवन यांच्या खाणाखुणा ज्ञानेश्वरीत आहेत का या दृष्टीने या पृष्ठभूमीवर व या परिवेशात ज्ञानेश्वरीचं परिशीलन व्हावयास हवं. स्वतः उपेक्षितांचं जीव घेणं जिणं जगल्याने उपेक्षितांची दुःखे किती दुखरी, खुपरी व गहिरी असतात हे कुठे कुठे जागजागी ज्ञानदेव कळवळून बोलतात. साठोत्तरीनंतरच्या साहित्यकारांनी, विशेषतः विद्रोही साहित्यिकांनी इकडे थोडे आवर्जून लक्ष पुरवले तर त्यांना त्यांचे प्रतिबिंब ज्ञानेश्वरीत दिसू शकेल. ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीच्या अखेरी मागितलेल्या पसायदानातून हे दर्शन घडू शकेल. यासाठी असामान्य प्रतिभा असावी लागते हे मात्र खरं. याचबरोबर वेदांचा अतिरेकी अभिमान बाळगणारांनीही न पढावे वेद नको शास्त्रबोध' असं संत नामया आणि *'जरी वेद बहुत बोलिले विविध भेद सूचिले । तऱ्ही आपण हित आपले । तेचि घेणे ।।* असं स्वतः ज्ञानिया माऊली का म्हणून गेले; आणि श्री ज्ञानदेवांच्या या जागरणातून प्रेरणा घेऊन संत चोखोबा *'वेदांचे वचन न कळे आम्हा । न कळे ज्ञान, न कळे पुराण'* असं काहीसं उदासीनतेनं का म्हणाला याचा अंतर्मुख होऊन विचार करायला हवा.

*'ॐ नमोजी आद्या । वेद प्रतिपाद्या ।।'* असं ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीच म्हणून वेद प्रतिपादणाऱ्या वेद कल्पदिवाला नमस्कार करणारे ज्ञानदेव *'जरी वेद बहुत बोलिले । विविध भेद सूचिले । तरी आपण हित आपले । तेचि घेणे ।।'* असं वेदाविषयीच का म्हणतात, वेदाविषयी त्यांच्या मनी काही विवाद होता काय, 'वेदांनी बरेच काही सांगितलं असलं तरी त्यातलं आपल्या हिताचं असेल तेवढं घ्यावं' असं सांगून ते, काहीसा का होईना, संभ्रम निर्माण का करतात, याचा खोलवर अभ्यास व्हायला हवा. अशावेळी ज्ञानेश्वर खरी वाट दाखवणार.

संत साहित्यावर व चरित्रावर उभारलेली दि. बा. मोकाशी यांची 'आनंद ओवरी' ही कादंबरी व या कादंबरीवर याच नावानं बेतलेलं व विजय तेंडुलकर यांनी संकलित केलेलं वारकरी नाटक म्हणजे संपूर्ण निर्दोष कलाकृती असं कुणालाच निर्धोकपणे व निश्चितपणे

म्हणता येणार नसले तरी एक मापदंड, एक मानदंड इतक्या तोलामोलाच्या व काही नव्याचा शोध घेणाऱ्या, प्रचलित समजांना धक्का देणाऱ्या व श्रद्धांना बगल देणाऱ्या या साहित्यकृती आहेत. म्हणूनच वस्तुपाठ या मौलिकतेने त्या निरीक्षिता, परीक्षिता येण्यासारख्या आहेत व संत वाङ्मयाविषयी उदासीन असणाऱ्यांनाही भावण्यासारख्या आहेत.

'तुका दादा सापडला-हरवला' अशा हर्ष विमर्षाची अभिव्यक्ती तुकारामाचा धाकटा भाऊ कान्होबा याच्या मुखातून 'आनंद ओवरी' वरून मोठ्या उत्कटतेने व जिव्हाळ्याने होते, जी अंतःकरण हेलावून टाकते. दि. बा. मोकाशी यांनी आपले साहित्यिक कौशल्य व प्रतिभा पणाला लावून तुकारामाच्या अंतिम हरवण्याचा घेतलेला रससिद्ध शोधबोध मोठा हृद्य आहे. 'तुकादादा हरवला-सापडला' ही शोधाशोध कान्होबाच्या वाट्याला आलेली नेहमीचीच. शेवटचीही नेहमीसारखीच. आता तुकादादा हरवला तो कुठे सापडेनासा झालेला. 'संपला सार तो संसार' अशा काहीशा विदग्ध जाणीवेनं 'आम्ही जातो अमुच्या गावा, अमुचा रामराम घ्यावा' असं जगाला सांगून तुका जो गेला तो परत आलाच नाही. तो वैकुंठाला गेला म्हणजे नेमका कुठे गेला ? इंद्रायणी पल्याडच्या घनदाट निबिड निळ्यासावळ्या झाडीत तो, परतायचे नाही असे ठरवून गेला. असा तो गेला, गेला तो गेलाच, माघारी आला नाही. त्याची धोंगडी मागे राहिली. दि.बा. मोकाशी यांनी कान्होबाच्या अभिव्यक्तीतून तुकोबारायाच्या वैकुंठगमनाचा हा असा शोध घेतला. संत वाङ्मयाच्या अभ्यासकांना विचार प्रवण करणारा, विशेष करून साहित्यिकांना प्रेरणा देणारा, संशोधकांना या अंगाने दिशादर्शी ठरणारा हा शोध आहे. यासाठी फार मागं जाण्याचं कारण नाही. साडेतीनशे वर्षांमागे तुकाराम आणि यांच्यामागे चारशे वर्षे ज्ञानेश्वर असा सात आठशे वर्षांचा धांडोळा यासाठी पुरा पडणारा आहे.

देशी भाषेचा अंगीकार करून ज्ञानदेवांनी 'ब्रह्मविद्येचा सुकाळ केला.' त्याचबरोबर 'कुळ जाति वर्ण' हे अकारण असल्याचे ठामपणे सांगितले. नामदेवांनी 'नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगी' असं सांगून जनसामान्यांना केवळ भक्तिपंथाला लावलं नाही, तर वर्ण व्यवस्थेला प्रोत्साहन देणाऱ्या समाज मनाविषयीची अप्रीती कृतिशीलतेने लक्षात आणून देण्यासाठी मंदिरात प्रवेश न करता मंदिरांबाहेरच्या पायरीवरून विठ्ठलदर्शन घेण्याचे प्रतिज्ञाबद्ध व्रत आयुष्यभर निभावले, गोरोबा कुंभारांनी *'अंतरीचे गुज बोलू ऐसे काही । वर्ण व्यक्त नाही शब्द शून्य'* असं परखडपणे ऐकवून वर्णव्यवस्था शून्यासमान लेखली. *'आयुष्य गेले उष्टे खाया । तरी लाज न वाटे चित्ता। अवघ्या वर्षामाजी हीन केली जाती । विटाळ विटाळ म्हणती क्षणोक्षणी ।।'* ही अंतरीची सल सांगून जातिव्यवस्थेवरची नाराजी व्यक्त केली. 'स्त्री जन्म म्हणूनी न व्हावे उदास ।' असं स्वतःला समजावून व इतरांना ऐकवून जनाबाईनं लिंगभेद मानणाऱ्या पौरुषाला लाजवलं. संतजनांच्या अशा मांदियाळीनंतर चारशे वर्षांनी तुकारामांनी 'भेदाभेद अमंगळ' असं तळमळून सांगून जातीजातीमधला अमंगळ दुरावा दूर केला. संतांची अभंग-ओव्यांमधली ही शिकवण विद्वेषाची नव्हती तर विद्रोहाची होती. फुले-शाहू-आंबेडकर यांनी हाच मार्ग धरून समाज प्रबोधन केलं.

विद्रोही साहित्यिकांना व विचारवंतांना हा इतिहास आठवावा लागेल; नाहीतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले त्याप्रमाणे जो आपला इतिहास विसरतात त्यांना तोच इतिहास पुन्हा भोगावा लागेल !

ज्ञानेश्वरीतही अशा कैक सूचक व मर्मभेदक जागा आहेत ज्यावर पटेल असं, भावेल असं नव्यानं भाष्य होऊ शकेल. एवढेच नव्हे तर काळाच्याही 'पुढे चालती ज्ञानेश्वर' याची प्रचीतीही घडू शकेल. अक्षर साहित्याची हीच तर खरी कसोटी आहे.पुष्पदंत, मुकुंदराज, चक्रधर, ज्ञानेश्वर आदि संतजन यांची नावे आजही उगाच घेतली जात नाहीत; उद्याही ती घेतली जातील; आणि तळागाळातल्यासह सर्वांसाठी पसायदान मागितलं जाईल ! तळागाळातल्या सर्वांकडून ते मागितलं जाईल !

विद्रोहींची भूमिका जशी वादग्रस्त तशी बुद्धि-प्रामाण्यवाद्यांची विज्ञाननिष्ठ भूमिकाही तशीच वादग्रस्त. यांच्यातील काही संशोधक म्हणतात की ज्ञानेश्वरच काय, तुकारामांनादेखील यांना लिहिता वाचता येत नव्हतं. यांच्या प्रतिपादनाची धार इतकी वाढते की समर्थ रामदासही यांच्यापैकीच असे म्हणण्यापर्यंत मजल जाते. अशा





अनुक्रमणिका

प्रकारची विधाने करणारे धांडसी तर खरेच; पण मौखिक परंपरेतून उच्च तत्त्वज्ञान प्रवाहित राहिलं होतं हे जर यांनी मान्य केलं तर हे संत अक्षरशत्रू होत की यांच्या विद्वत्तेविषयी साशंक असणारे ते यांचे हितशत्रू याचा निवाडा करण्याचा प्रसंग उद्‌भवतो. ज्ञानेश्वरांनी समाधी घेतलीच कशावरून, आणि जर त्यांनी समाधी घेतलीच असेल तर त्या स्थानी उत्खनन करून सत्यसंशोधन करण्यात अडचण का यासाठी अशा तऱ्हेच्या शंकाकुशंका अर्थात तर्ककुतर्क श्रद्धाळूंना हास्यजनक व उद्वेगजनक वाटल्यावाचून राहणार नाहीत. नव्या जुन्याचा संघर्ष तसा सनातन आहे; पण यावर उलट साधकबाधक भाष्य करताना तारतम्य अवश्य असावयास पाहिजे.

साहित्य विश्वातच नव्हे, तर सर्वच क्षेत्रात नवं जुनं हा वाद रंगत असतो. विषयाच्या अंगानंही यावर उलट सुलट चर्चा होत असते. पण तसं पाहता, कुठलाच विषय जुना नसतो. त्याच्या कथनाच्या पद्धतीत व्यक्तिनिहाय व कालनिहाय भेद असू शकतात. विषयातली अर्थसूचकता व आशयगर्भता सार्वकालिक असल्याने विषयाचं नाविन्य या दिशेनं पारखायला हवं. तसा प्रयत्न या ना त्या कारणाने, अभ्यासाच्या वा मार्गदर्शनाच्या निमित्तानं आजकाल होत आहे ही तशी समाधानाची बाजू आहे व हे स्वागतार्हही आहे. तुकारामाचे समग्र अभंग पुन्हा सटीक संकलित करण्याचा मोह दिलीप पुरुषोत्तम चित्रे या कवींना, का होतो व कबीराचे दोहे मराठीत अनुवादित करण्याची स्फूर्ती मंगेश पाडगावकर यांना का मिळते, याचा विचार या पार्श्वभूमीवर व्हावयास हवा. ज्ञानेश्वरीही कौतुकाचा विषय होते. या कसोट्यांवर ज्ञानेश्वरी उतरत असल्यानं एकंदर संत साहित्यात व संतांच्या मांदियाळीत ' पुढे चालती ज्ञानेश्वर' असं म्हटलं जातं आणि म्हणावंही लागतं.

ज्ञानोबा, नामया, तुकोबा, निळोबा, चोखोबा, असेच हे सगळे हाडामासाने व पिंडाने जसे संत होते तसे हे साहित्यिकही होते. त्यांच्या साहित्यातील भक्ती हा त्यांचा 'कंठरस' होता. भक्ती ही त्यांची ललाटरेषा आणि ललाटशोभा होती. गळ्यातली माळ व कपाळीचा टिळा ही यांचीच प्रतीके. वारकऱ्यांच्या गळा तुळशीची माळ ही अभक्ष्य वर्ज्य केल्याची द्योतक आहे आणि कपाळीचा केशरी टिळा सदाचाराचे व्रत ध्यानी, मनी व हृदयी ठामपणे व ठळकपणे बिंबवल्याचा आश्वासक आहे. पावला पाठोपाठ पावलं टाकून सुखासमाधानानं विठूरायाच्या नाम गजरात व टाळ मृदुंगाच्या तालावर गाठावयाचं त्यांच्या आवडीचं माहेर पंढरपूर हे त्यांचं मोक्षनिधान आहे. अग्रूपाच्या विसाव्याचं प्रियतम स्थान आहे, जिथे भेदाभेद विसरून चंद्रभागेच्या साक्षीनं सारे गळामिठी भेटतात. याचा असा हा सगळा शोध या ज्ञानयात्रेतून, या प्रदक्षिणेतून, या परिक्रमेतून, दिंड्या पताकांच्या वारीतून घेण्यासारखा आहे, होण्यासारखा आहे; अशा ऐसपैस शोधयात्रेच्या अभ्यासातून होण्यासारखा आहे.

हा शोध अभ्यास सुकर व्हावा यासाठी सर्वच मराठी संतांनी आपापले अध्याय आपल्या मायबोली मराठी वाणीने एका पाठोपाठ एक याप्रमाणे हारीने रचून ठेवलेले आहेत. मराठीवर आणि मराठी जनांवर अशी संतकृपा झाली म्हणूनच संत बहिणाबाई म्हणून गेली, *'संतकृपा झाली । इमारत फळा आली ।। ज्ञानदेवे रचिला पाया । उभारले देवालया ।। नामा तयाचा किंकर । तेणे केला हा-विस्तार ।। जनार्दन एकनाथ । खांब दिला भागवत ।। तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ।।'* ज्ञानदेवांनी पाया घातलेल्या मंदिरावर तुकारामांनी कळस चढवला हे केवळ शब्दार्थाने सत्य नाही, तर संतांच्या मांदियाळीतले तेराव्या शतकातले अग्रणी ज्ञानदेव आणि या कडीतले चारशे वर्षांनंतरचे सतराव्या शतकाच्या प्रारंभीचे तुकाराम या मांदियाळीतले कळसाध्याय होते. संत शिखरावरचा हा कळस थेट आकाशाला जाऊन भिडला.

❖❖❖

शांतिलाल भंडारी
४०/४७, 'चारुश्री', अभिमानश्री सोसायटी,
पुणे ४११ ००८.

## हस्तदोष दुरुस्ती

अंक क्र. ३२२, पृष्ठ ४, स्तंभ २, परिच्छेद२, ओळ क्र. १ वरील वाक्य 'नाट्यछटाकार दिवाकर' असे वाचावे.



अनुक्रमणिका

# संस्कृत साहित्य परिचय : प्रा. वसंत भ. उत्पात

□ डॉ. वि. य. कुलकर्णी




हा एक अप्रतिम संदर्भ-ग्रंथ आहे. लेखकाने आपल्या 'मनोगतात' म्हटले आहे, 'पालक, शिक्षक, विद्यार्थी, नवोदित वक्ते, कीर्तनकार, प्रवचनकार इत्यादींनी प्रस्तुत ग्रंथ हाती धरला तर त्यांना निश्चितपणे खूप काही सापडेल.' (पृ. १०), तर प्रस्तावना लेखक प्रा. वा. ना. उत्पात म्हणतात, 'संस्कृत वाङ्मयाचा हा संदर्भ-ग्रंथ झाला आहे. ...भारतीय संस्कृतीचे पक्वान्न सोन्याच्या ताटातून वाढले आहे.' (पृ. १३) ''इंग्रजी शिक्षणाने बुद्धी भ्रष्ट झालेल्या उच्च विद्याविभूषित लोकांना आपल्या संस्कृत भाषेत किती अगाध ज्ञान आहे याची कल्पना नाही... (केवळ) स्थापत्यशास्त्रात (इंजिनिअरिंग) संस्कृतमध्ये साडे-नऊ-हजार ग्रंथ आहेत. (धर्म, साहित्य, विज्ञान, गणित, वैद्यक इत्यादी शास्त्रशाखांचे हजारो ग्रंथ उपलब्ध आहेतच.) (म्हणून) इंग्रजी शिक्षणाने बुद्धी भ्रष्ट झालेल्या सुशिक्षितांचा बुद्धिभ्रम या ग्रंथाच्या वाचनाने दूर होईल !' (पृ. १२-१३) प्रा. वा. ना. उत्पात यांचे हे परखड मत वस्तुस्थितीला धरूनच आहेत ! आपल्या आत्मविस्मृतीतून जन्मास आलेल्या न्यूनगंडाला सीमा राहिलेली नाही. हा ग्रंथ आपल्याला आपलेच दर्शन घडविणारा आरसा झाला आहे. प्रा. वसंतराव उत्पात यांनी एक भव्य स्वप्न पाहिले आहे– 'समग्र आशिया महाद्वीपाला एकतेच्या सूत्रांत बांधण्याचे स्तुत्य कार्य आमच्या देववाणीच्या द्वारा संपन्न होऊ शकेल--- श्रीलंका, म्यानमार, सयाम, कम्बोडिया, सुमात्रा, जावा, मलेशिया इत्यादि देशातील भाषांत निम्म्याहून अधिक शब्द संस्कृतोद्भव आहेत.--- बालीद्वीपात आजही पंडितलोक गायत्री मंत्राचा जप करतात...' (पृ. २२८-२२९)

प्रा. वसंतराव उत्पात यांनी हे जे स्वप्न पाहिले आहे. त्याचाही सांस्कृतिक इतिहास ध्यानी घेण्याजोगा आहे. पू. गौतमबुद्ध हा तर भिक्षू होता. संन्यासी होता. तरी त्याने आपली उत्तरक्रिया 'सम्राटाच्या पद्धतीने' करावी, अशी इच्छा प्रकट केली; आणि ती तशीच करण्यात आली. याचा अर्थ काय ? गौतमबुद्धाला या अखेरच्या इच्छेतून काय व्यक्त करायचे होते ? - तो राजपुत्र होता. क्षत्रिय होता. राजशासन कसे करावे, याचे त्याने शिक्षण घेतले होते. त्याने या अंतिम इच्छेने हेच सूचित केले की, 'मी साम्राज्यच निर्माण केले ! हे 'धर्मसाम्राज्य' आहे ! राज्ये सोयीस्कर रीत्या ज्याने त्याने सांभाळावीत; पण समाजांची सांस्कृतिक एकात्मता निर्माण करता येते. राज्यकर्ते येतात नि जातात; पण धर्मसाम्राज्य टिकणारे-शाश्वत असते. मी 'धर्मचक्रप्रवर्तन' केले आहे !' ...मला वाटते, आता या एकविसाव्या शतकात पुनः एकदा नवे धर्मचक्रप्रवर्तन करायला हवे ! – 'संस्कृत, संस्कृति नि संस्कार' यांच्या प्रसारासाठी हिंदू नि बौद्ध संन्यासी नि भिक्षू जर पुनः एकदा 'धर्मसाम्राज्य' निर्माण करण्याचे 'उत्कट भव्य' स्वप्न घेऊन बाहेर पडणार असतील तर प्रा. वसंतराव उत्पात यांचा हा ग्रंथ त्यांची 'उत्कृष्ट प्राथमिक तयारी' करून घेऊ शकेल !

या ग्रंथात प्रा. वसंतरावांनी संस्कृत साहित्याचा परिचय करून देण्यासाठी जे विभाग कल्पिले आहेत, ते त्यांच्या अभ्यासाचा नि चिंतनाचा उत्कृष्ट परिचय करून देणारे



अनुक्रमणिका

आहेत. त्या त्या विभागातील साहित्याचा त्यांनी जो आढावा घेतला आहे, त्यांतून त्यांच्या असीम परिश्रमांची कल्पना येते.

प्रा. उत्पातांनी 'संस्कृत साहित्याचा परिचय' वैदिक साहित्य, रामायण-महाभारत नि पुराणे, व्याकरणशास्त्र, शब्दकोश, संगीतशास्त्र, नाटक, कालिदासादि कवींची महाकाव्ये, गीतिकाव्य, गद्यकाव्य, कथासाहित्य, अलंकारशास्त्र, धर्म-अर्थ-काम या पुरुषार्थांवरील साहित्य, मोक्षशास्त्र– अशा तेरा विभागात करून दिला आहे. याखेरीज संस्कृत भाषेचे आधुनिक काळातील महत्त्वही निवेदिले आहे. हे जे वर्गीकरण आहे, त्यातूनच त्यांच्या अभ्यासाचा विस्तार नि चिंतनाची गंभीरता ध्यानी येते. याखेरीज त्यांनी जी परिशिष्टे दिली आहेत, तीही स्वतंत्र अभ्यासनीय आहेत.

श्री. वसंतराव उत्पात हे 'या विषयावर हे-हे ग्रंथ आहेत, त्यांचा हा-हा विषय आहे,' असा ग्रंथ-परिचय देत नाहीत. अनेक ग्रंथांचा परिचय त्यांनी रसग्रहणात्मक रीतीने दिला आहे. अनेक ग्रंथांचा परिचय देताना त्यांनी त्या त्या ग्रंथाचे जे मार्मिक मूल्यमापन केले आहे, ते 'अल्पाक्षर' पण 'अर्थगर्भ' असे आहे. त्या दृष्टीने या 'साहित्य परिचयाने' विशिष्ट आवड असणाऱ्या वाचकांना आपण कोणते ग्रंथ वाचायला हवेत, हे मनोमन ठरवता येईल ! - या 'संस्कृत साहित्य परिचयातील' काही थोडी चिंतने वाचकांच्या पुढे ठेवतो, म्हणजे चिंतनाची खोली ध्यानात येऊन जिज्ञासा निर्माण होईल. ही चिंतने देत असताना काही ठिकाणी आम्ही आमची चिंतने (त्यात थोडी भर म्हणून–) देत आहोत. त्यांचा हेतू या ग्रंथातील त्रुटी वा दोष दाखविणे हा नाही. (या नितांत सुंदर नि उत्कृष्ट संदर्भ-ग्रंथाला 'एका शिष्टाने' जोडलेले आणखी एक 'परिशिष्ट' असा त्याचा अर्थ आहे !!)

१. महर्षी अंगिरसांनी श्रीकृष्णाला वेदान्ताचा उपदेश देताना सामवेदाचे गायन समजावून सांगितले होते. (छांदोग्य-उपनिषद्)...श्रीकृष्ण जेव्हा त्यात पारंगत झाला तेव्हा मुरलीच्या स्वरात त्यांनी सामगान करण्यास सुरुवात केली. (पृ. २८-२९)
२. शतपथ ब्राह्मण ग्रंथात तेहतीस देवतांचा उल्लेख आहे. ('कोटी' म्हणजे प्रकार ! म्हणून देव तेहतीस कोटी !) आठ वसू, अकरा रूद्र, बारा आदित्य, एक आकाश आणि एक पृथ्वी !
३. 'वेद' शब्दाचा अर्थ सांगताना 'विद्' धातूचा अर्थ जाणणे असा दिला आहे. (तो बरोबरच आहे. पण–) 'विद्' धातूचे तीन अर्थ होतात, व ते तिन्ही 'वेद' या शब्दाशी निगडित आहेत. विद्-विद्यते. (असणे) म्हणजे शास्त्र. विद्-वेत्ति. (जाणणे) म्हणजे ज्ञान. आणि 'विद्' - विन्दते. (मिळविणे) जीवनातील प्राप्तव्य ! 'वेद' या शब्दाच्या या तीन अर्थछटा होऊ शकतात.
४. ब्राह्मण ग्रंथांमधील या लोकोपकारी व उच्च सिद्धान्तांच्या छायेतच तथागत बुद्धांनी आपल्या वाणीद्वारे प्रयोगात्मक परीक्षण केले. (पृ. ३५) - हा विचार महत्त्वाचा आहे. हिन्दुधर्म आणि बौद्धधर्म यांचे निकटचे नाते सांगणारा आहे.
५. ...ब्राह्मण ग्रंथांत गृहस्थाश्रमातील यज्ञविषयक आणि इतर अनेक कर्मांचे प्रतिपादन आहे... त्याचप्रमाणे वानप्रस्थाश्रमातील यज्ञ, महाव्रते इत्यादींचे विवेचन आरण्यक ग्रंथांत येते. (त्यावरून ध्यानात येते की, यज्ञाची बाह्य, दृश्य प्रक्रिया ही रुपके आहेत.) त्यावरून कर्ममार्ग व ज्ञानमार्ग यांचा सुंदर समन्वय घडून येतो. (पृ. ३६) ... कर्म-भावनेला धरून ब्राह्मण ग्रंथांची रचना झाली आहे; तर ज्ञान-भावनेचा धागा उपनिषदांनी पकडला आहे. (पृ. ३७) (पण उपनिषदांचा परिचय फारच धावता आणि अगदी वरवरचा आला आहे.)
६. भगवद्गीता 'कर्मयोगपर' आहे, (पृ. ४३) असे आपले मत श्री. उत्पातांनी नोंदवले आहे. हा वाद जुनाच आहे. शंकराचार्यांनी गीता 'संन्यासपर' आहे, असे सांगितले– तर लो. टिळकांनी गीता 'कर्मयोगपर' आहे, असे आग्रहपूर्वक सांगितले.

(ब्राह्मण-ग्रंथ 'यज्ञमार्ग' (म्हणजेच कर्ममार्ग) सांगणारे आहेत, नि उपनिषदे 'ज्ञानमार्ग' (म्हणजे कर्मसंन्यास) सांगणारी आहेत. या दोन्ही 'श्रुती'च असल्याने कोण बरोबर नि कोण चूक हे कसे सांगणार? - महत्त्वाचा प्रश्न आहे 'गीता काय सांगते?' - भगवंताने 'कर्ममार्गातील कर्म स्वीकारले,

पण फलासक्ती सोडायला सांगितले; तर ज्ञानमार्गातील ज्ञान स्वीकारले, पण निष्क्रियता टाकायला सांगितली. म्हणजे कर्ममार्गाला (फल) संन्यासाचे नि ज्ञानमार्गाला कर्माचे 'कलम' करण्यात आले !... आणि अशा रीतीने गीतेत 'ज्ञानकर्म समन्वय' साधला आहे.)

७. शिक्षा (ग्रंथ), कल्पसूत्रे (म्हणजे श्रौतसूत्र, गृह्यसूत्र आणि धर्मसूत्र) या ग्रंथांचा परिचय सुरेख करून दिला आहे.

८. 'रामायणाचे महत्त्व' सांगताना श्री. उत्पातांनी म्हटले आहे, 'आपली सभ्यता गृहस्थाश्रमाच्या दृढ पायावरच प्रतिष्ठित आहे.' (पृ. ६३) ...(इथे सहजच आठवले की, श्री. उत्पातांनी आपल्या ग्रंथाची अर्पण-पत्रिका 'आपल्या सहधर्मचारिणीस–' लिहिली आहे. त्यात म्हटले आहे– 'अगस्त्य-पत्नी लोपामुद्रेप्रमाणे स्वत्व विसरून जिने सावलीसारखी सोबत केली...'' स्वतः श्री. उत्पातांचा गृहस्थाश्रम किती 'सुदृढ पायावर' उभा आहे, याची कल्पना येते !...)
महाभारताबद्दल म्हटले आहे– 'अध्यात्म आणि नीतिशास्त्राचा हा विश्वकोशच आहे.' (पृ. ६४)
इथेच एक अतिशय सुंदल सामाजिक चिंतन प्रकट झाले आहे.– ''नवी वैज्ञानिक संशोधने लोकांपर्यंत नेऊन पोचविण्याचे आणि लोकांच्या जीवनात समाविष्ट करण्याचे कोणतेही साधन (आजच्या) वैज्ञानिकांजवळ नाही. पण भारतवर्षात मात्र कथा-कीर्तनांच्या, प्रवचनांच्याद्वारे विशेषज्ञ आणि सामान्य लोक यांच्यातली दरी बुजविण्याचे काम प्राचीन काळापासून होत आले आहे. त्यामुळेच रामायण-महाभारत आणि पुराणे यांच्यातल्या कथा कानाकोपऱ्यापर्यंत पसरल्या आणि व्यासांचे महनीय ज्ञान सामान्यजनांच्या मनामनात रिघून अमर झाले.'' (पृ. ६५) ... (भारतीय संस्कृतीचे हे वैशिष्ट्य आहेच; पण मंदिरांतून नि कीर्तनकार-प्रवचनकारांनी कोणत्या दृष्टीने नि कसा व्यासंग करावा, याचेही हे मार्गदर्शन आहे !) 'पुराणांचाही हेतू वाङ्मयाद्वारे जगाचे एकीकरण घडवावे.' अशी व्यासांची भावना होती.'' (पृ. ७१) - माझ्या मनात येते, जागतिक व्यापारीकरण होते आहे, पण जागतिक सांस्कृतिकरण देण्याचा आराखडा अजून कोणी तयार केलेला नाही !

९. श्री. उत्पातांनी पुराणांचा मात्र परिचय अत्यंत त्रुजवी दिला आहे. त्यातल्या त्यात 'भागवताचा परिचय' विस्तृत दिला आहे. आणि 'अग्निपुराणात' आणि 'गरूडपुराणात' 'व्याकरणाचा अभ्यास' आला आहे, हे सांगितले आहे. (पृ. ८१)
पुराणांचा हा परिचय फारच वरवरचा आहे. वास्तविक पुराणात अनेक विषय आलेले असून ते अत्यंत शुद्ध शास्त्रीय पायावर उभे आहेत. विविध पुराणात खालील विषयांवर उद्बोधक माहिती मिळते–
वास्तुशास्त्र, चित्रकला, तूलिका ('ब्रश') कसे तयार करावेत, रंग, वज्रलेप, शिल्पमूर्तींची प्रमाणे, आयुर्वेद, वृक्ष-आयुर्वेद, पशुचिकित्सा, संगीत, वाद्ये, नृत्य, नृत्यांतील मुद्राभिनय, योगशास्त्र, प्राणायाम, नाट्यशास्त्र, व्याकरण, अलंकार, रसायनशास्त्र, विविध धातूंची भस्मे तयार करणे,– असे किती म्हणून विषय सांगावेत ? प्राचीन काळातील अखिल भारतीय प्रांता-प्रांतातील वैशिष्ट्यपूर्ण सर्व भौतिक विद्यांचे संकलन या पुराणांत केलेले आहे. त्या अजब कलांचे नि कारागिरीचे शेकडो नमूने आजही भारतात ठिकठिकाणी उभे आहेत ! यासाठी पुराणांचा परिचय अधिक तपशीलवार द्यायला हवा होता.

१०. संगीत, नाटक या कलांवरील विवेचन व तपशील सुरेखच आहे; पण नृत्यावर स्वतंत्र लेखन हवे होते. ते का राहिले, याची कल्पना नाही. नृत्यावरचे अनेक संदर्भ संस्कृत साहित्यातून आहेत; त्यावर ग्रंथही आहेत.

महाकवींचा परिचय देताना श्री. उत्पातांनी कालिदास, भवभूती, भट्ट, श्रीहर्ष इत्यादींच्या काव्यांचा धावता पण सुरेख परिचय दिला आहे. महाकवी कालिदासांचे अत्यंत मार्मिकपणे तीन शब्दांत वर्णन केले आहे. कालिदासांचा सारा संदेश या तीन शब्दांत सामावतो. ते तीन शब्द म्हणजे 'त्याग, तपोवन आणि तपस्या' हे होत ! - सुंदर ! फार सुंदर ! भारतीय संस्कृतीच या तीन शब्दांत सामावली आहे. जणू हीच ती त्रिभुवनव्यापी विष्णूची तीन पावले !

पण माझ्या मनात येते, आणखी दोन संस्कृत ग्रंथांचा परिचय यायला हवा होता. कवी परमानंदांचे संस्कृत शिवचरित्र आणि श्री. गागाभट्टांचा राज्याभिषेक विधी ! माझ्या समजुतीप्रमाणे रघुनाथपंडितांचा राज्यव्यवहारकोशही संस्कृतमधूनच आहे ! हे ग्रंथ फार मोलाचे !

तसेच कोश वाङ्मयात श्री. अशोक मल्ल लिखित ''नृत्य-रत्न-कोश'' याचा मी एका स्थानी उल्लेख वाचला; तो ग्रंथ मी पाहिला मात्र नाही. (संदर्भ- 'भरतनाट्यम्' भाग १. डॉ. लक्ष्मीनारायण गर्ग.. प्रका. संगीत कार्यालय, हाथरस (उ.प्र.) संस्करण २००१. पृ. ३६)

संस्कृत साहित्याचा एवढा प्रचंड सागर आहे की, कुणालाही, 'घागरीत सागर' भरता येणे शक्य नाही. परंतु प्रा. वसंतराव उत्पातांचे परिश्रम, त्यांची ग्रंथांची मांडणी, त्यांनी केलेले वर्गीकरण नि या साहित्याचा त्यांनी घडविलेला 'साहित्यिक परिचय' अप्रतिम आहे. मराठी भाषेत ही एक मोलाची भर आहे. मी असे ऐकतो की, या ग्रंथावर श्री. अतुल कुलकर्णी यांनी 'झी-मराठी' या वाहिनीवर 'बुक शेल्फ' या कार्यक्रमात चर्चा घडवून आणली होती, आणि हे पुस्तक 'सर्वांग सुंदर' असल्याचा निर्वाळा दिला होता. आता यापेक्षा मी अधिक वेगळे ते काय सांगणार ? प्रा. वा. ना. उत्पातांनी 'भारताचे वैज्ञानिक क्षेत्रातील योगदान व शास्त्रज्ञ यांचा परिचय पुढील पुस्तकात करून द्यावा, अशी सूचना केली आहेच' (पृ. १४) या सूचनेला मी सहर्ष पाठिंबा देतो.

श्री. वसंतराव उत्पात यांचे सर्व मराठी वाचकांतर्फे मनःपूर्वक अभिनंदन. आमच्या वाहिनीसाहेब सौ. सुनंदाताई यांना या निमित्ताने विनंती की, 'स्वत्व' 'न विसरता', 'त्यांनी' हे कार्य करावे म्हणून अवश्य 'स्त्री-हट्ट' धरावा !

❖❖❖

संस्कृत साहित्य परिचय, लेखक - प्रा. वसंत भ. उत्पात, प्रकाशक - स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे.

प्रथमावृत्ती - सप्टेंबर २००५, पृष्ठसंख्या : २६०, मूल्य : रु. २००. प्रस्तावना : प्रा. वा. ना. उत्पात.


वि. य. कुलकर्णी
शिवगिरी, काँ. फडके रस्ता, १४१२ सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०. दूरभाष : (०२०) २४४८३५१५


---

## अक्षरमहर्षी र. कृ. जोशी

विख्यात अक्षरांकनकार-कलेचे प्रवर्तक - अक्षरऋषी, ६०व्या दशकातील मूर्त कवितेचे जनक, अक्षरऋषी श्री. र. कृ. जोशी यांचे निधन दि. ५-२-२००८ झाले. वैदिक संस्कृतचे संगणकावरील प्रमाणीकरणाच्या कामासाठी भारत सरकारचे प्रतिनिधी म्हणून सॅन फ्रॅन्सिस्को येथे गेले असता विमानतळावरच हृदयविकाराचा-तीव्र झटका झाला आणि त्यातच त्यांचे उपचारांच्या दरम्यान निधन झाले. 'टायपोग्राफी' हा विषय अभ्यासासाठी नव्हता तरी जे जे महाविद्यालयात त्याचा अभ्यास व संशोधन केले.

जे. जे. महाविद्यालयात 'व्हिजिटिंग फॅकल्टी' म्हणून ते व्याख्याते होते. त्यांच्यामुळे अक्षरांकन हा विषय कला महाविद्यालयात सुरू झाला. लिपीची दृश्यात्मकता, लिपीचे सौंदर्यमूल्य, शिलालेखातील लिपी, कवितेच्या माध्यमातून लिपीची दृश्यात्मकता सामान्यांपर्यंत पोहोचविण्याचा 'र. कृं.' नी मौज-सत्यकथेच्या माध्यमातून प्रयत्न केला. कवितेला नवा 'दृश्यफॉर्म' मिळाला. 'मंगल' हा अक्षर- 'फॉन्ट' 'मायकोसॉफ्ट' कंपनीने सर्वांपर्यंत पोहोचविला. 'हॅपनिंग' या शीर्षकाखाली कलेला जनमानसापर्यंत नेण्याचे आगळेवेगळे कार्य त्यांनी केले. वैदिक संस्कृतचे प्रमाणीकरण करण्याची त्यांची धडपड प्रसंगी 'सीडॅक'मार्फत देण्याचा एक प्रयत्न अपुरा पडला. परंतु अमेरिकन कंपनीने हा प्रयत्न हाती घेतल्याचे वृत्तपत्रातून वाचले. पुन्हा त्यासाठी सॅनफ्रॉन्सिस्कोला पोहोचल्यावर विमानतळावरच काळाने त्यांचा हा प्रयत्न थांबविला. अच्युत पालव सारख्या त्यांच्या विद्यार्थ्यांने हा प्रयत्न सुरू करावा अशी सर्वांचीच इच्छा असेल. 'रकृं'ना आदरांजली !

अनुक्रमणिका

# ‘उकल’ :
## माणसातल्या चांगुलपणाचा शोध घेणारा कथासंग्रह

□ डॉ. सतीश बडवे




‘उकल’ हा केशव भणगे यांचा कथासंग्रह मराठीतल्या मध्यमवर्गीय जाणिवेचे प्रतिनिधित्व करणारा आहे. मुळातच काही वर्षांपासून कथालेखनाशी संबंधित असणाऱ्या केशव भणगे यांनी सातत्याने कथालेखन केले असले तरी ते विपुल प्रमाणात नव्हते. त्यामुळे बऱ्यापैकी कथांची संख्या झाल्यानंतर एकत्रितपणे अकरा कथांचा हा संग्रह त्यांनी मराठी वाचकांना उपलब्ध करून दिला आहे. कविप्रकृती लाभलेल्या केशव भणगे यांनी लिहिलेल्या कथांमध्ये विषयाचे विशेष वैविध्य आढळत नसले तरी ज्या भूमिकेतून ते कथाविषयाची हाताळणी करतात ती मात्र महत्त्वाची ठरते. त्यातच या कथासंग्रहाचे वैशिष्ट्य दडलेले आहे. ती भूमिका म्हणजे ‘माणसातल्या चांगुलपणाचा शोध’ घेणे, ही आहे. त्यांच्या सर्वच कथांमध्ये ही भूमिका प्रभावी ठरलेली आहे.

वस्तुतः ज्या एकविसाव्या शतकात आपण आहोत त्या काळाचे प्रश्न निराळे आहेत. इथल्या समाजव्यवस्थेमुळे, लोकांच्या संकुचित आणि स्वार्थी वृत्तीमुळे विविध प्रश्नांना सामोरे जावे लागत आहे. त्यातच उदारीकरण, जागतिकीकरण यांचा जीवनात झालेला शिरकाव, माध्यमांची चहुबाजुंनी होणारी आक्रमणे, त्यातील हिंसा आणि नग्नतेचे भडक प्रदर्शन यामुळे बदललेली जीवनशैली हा जीवनाचा नवा पैलू प्रत्यक्षात आला आहे. या नव्या वातावरणात पूर्वीचे असणारे सहसंवादी जीवन अनुभवायला मिळणे दुरापास्त झाले आहे. एकमेकांशी असणारा संवाद संपुष्टात येत आहे. भयाण वास्तवाला सामोरे जाताना माणसाची घुसमट होत आहे. या हरवलेल्या जीवनात माणूसपणाचा चेहरा शोधणाऱ्या कथा केशव भणगे यांच्या कथासंग्रहामध्ये आढळतात. या कथांची जातकुळी हरिभाऊ आपटे, दिवाकर कृष्ण, य. गो. जोशी यांच्या कथांशी मिळतीजुळती आहे. त्यात सोपेपणा, सुलभता आल्याने आणि विशिष्ट विचार आपण कथेतून देत आहोत अशाप्रकारची ‘पोझ’ नसल्याने ‘साध्या वळणाची कथा’ हेही त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य सहज जाणवते. उपदेश आणि प्रबोधन हे त्यांच्या लेखनाचे हेतू नाहीत.

एखाद्या सामान्य माणसाला आपल्या कथेत केंद्रस्थानी आणण्याचा केशव भणगे यांचा दृष्टिकोनही या कथासंग्रहात दिसतो. उदाहरणार्थच सांगायचे तर ‘मळभ’ कथेतील शिवराम, ‘शल्य’ कथेतील अनुपमा, ‘पाझर’ कथेतील भिवा रामोशी, ‘डाव’ कथेतील नावं बदलून अनेकांना फसविणारा डॉ. एस. एम. चऱ्होलीकर ही पात्रे अवतीभोवती वावरणारी आहेत असे कुणाही वाचकाला सहज जाणवते. ही माणसे पद, प्रतिष्ठा, पैसा यापासून दूर असणारी अशी आहेत. टोकाचा प्रामाणिकपणा जपणारा शिवराम आपल्या कृतीतून जगण्यातील नैतिक गोष्टी अधोरेखित करतो. केवळ परिस्थितीमुळे नाडली गेलेली अनुपमा वेश्या व्यवसायात ढकलली जाते व ज्यांच्याकडून आधार मिळेल असे वाटल्याने जगण्याचे बळ घेऊन उभी राहण्यासाठी ‘नरक’ सोडण्याची भाषा बोलते, त्यांच्याकडूनच आधार न मिळाल्याने आत्महत्या करते. चऱ्होलीकरला आलेला पांढरपेशांचा व सत्ताधाऱ्यांचा

अनुभवही असाच आहे. केशव भणगे या व्यक्तींचे चांगलेपण कथेतून मांडत जातात. त्यांच्याविषयी वाटणारी सहानुभूतीही या लेखनात प्रकटते. रूढार्थाने वास्तववादी चित्रण करणारी कथा असे या कथांबद्दल म्हणता येणार नसले तरी जाणवलेल्या वास्तवाशी नाते सांगणाऱ्या या कथा आहेत.

मराठी कथा जेव्हा उमलू लागली होती तेव्हाही अशाच प्रकारचे लेखन आढळत होते. पुढे त्यात कल्पनेचे कृत्रिम रंग मिसळले गेले व ती कृत्रिम बनू लागली. त्यामुळे मराठी कथासंस्कृतीबद्दल प्रश्नचिन्हही निर्माण झाले. अर्थात् त्यामुळे मराठी कथा थांबली नाही. उलट तिला सुयोग्य दिशा शोधायला मदतच झाली. एखादा लेखक जेव्हा कथा लिहितो तेव्हा त्याची भूमिका, त्याचा विचारव्यूह कथेचा आशय व आकृतिबंध निश्चित करीत असतो. प्रा. केशव भणगे यांचा पिंड माणूसपण जपणारा आहे. जे जे उदात्त आणि मांगल्यमय आहे त्याचा स्वीकार करणारा आहे. साहजिकच त्यांच्या कथेतील पात्रेही त्याचप्रकारची असतात. अर्थात् अशाच प्रकारचे कथानक पुन्हा पुन्हा आले तर त्याचाच एक साचा तयार होण्याची शक्यता असते. केशव भणगे यांच्या कथेत तसे घडत नाही. त्यात कधी रहस्यमयता येते, कधी नर्म विनोदी अंगाने त्यांची कथा जाते. उकल, बबन्याची गाडी, तपास या कथा याप्रकारच्या आहेत. लेखकाची भाषाशैलीही जुन्या लेखकांच्या वळणाशी नाते सांगणारी आहे. उदा.–

१) ''बाहेरचा पाऊस कोसळणं आता थांबलं होतं. आकाश पुन्हा स्वच्छ झालं होतं अन् मनातलं मळभही दूर झालं होतं.''

२. ''भिवाच्या तोंडून शब्द फुटेना. त्याच्या डोळ्यातून घळाघळा अश्रू ओघळू लागले.''

३) ''पुढच्या मजकुरावर नजर टाकताच मला धक्काच बसला. ती अनुपमाच होती. माझ्याकडे जीवनाची भीक मागायला ती आली होती आणि मी तिला मृत्यूची देणगी दिली.''

अशी काही उदाहरणे जुन्या मराठी कथेच्या भाषेचे वळण स्पष्ट करणारी आहेत. कथालेखनाचे तंत्रही जुन्याच वळणाचे आहे. भणगे यांच्या या कथालेखनाचा कालावधी सलग नाही. वेळोवेळी लिहिलेल्या कथांमधून हा संग्रह सिद्ध झालेला आहे. तरीही या कथा कधी मध्यमवर्गीय वृत्तीला कानपिचक्या देतात, कधी मिश्किलपणे हसायला लावतात, कधी वाचकाला अंतर्मुख करतात. मूल्यांचा ऱ्हास होत चाललेल्या काळात जुन्या वाटणाऱ्या पण आजही आवश्यक असणाऱ्या मूल्यांचा पाठपुरावा करणारी कथा केशव भणगे यांनी लिहिलेली आहे. नव्या काळाचा आणि जीवनशैलीचा संदर्भ देत नव्या पद्धतीने कथालेखन केशव भणगे यांच्याकडून अपेक्षित आहे. असे घडले तर मध्यमवर्गीय जाणिवांचे वर्तुळ भेदून त्यांची कथा अधिक सकस लेखनाकडे जाऊ शकेल, असा विश्वास वाटावा एवढे लेखनसामर्थ्य त्यांच्याकडे निश्चितच आहे, असे म्हणता येईल.

['उकल' (कथासंग्रह), लेखक - केशव भणगे, प्रकाशक - ज्ञानवितरण, १०७५, सदाशिव पेठ, पुणे ३०. किंमत - रु. १३०/-]

❖❖❖

**डॉ. सतीश बडवे**
प्रपाठक, मराठी भाषा व वाङ्मय विभाग
डॉ. बा. आं. म. विद्यापीठ, औरंगाबाद. पीन - ४३१ ००४.
भ्रमणभाष : ९८९०९६५५७६







अनुक्रमणिका

# बालकवींचे-
# तारकांचे गाणे

□ प्रा. एम. पी. पाटील

कुणि नाही ग, कुणि नाही
आम्हाला पाहत बाई.
शांति दाटली चोहिकडे,
या ग आतां पुढे पुढे.
लाजतलाजत
हळूच हांसत,
खेळ गडे, खेळू काही,
कोणीही पाहत नाही. १
सुंदरतेला नटवून,
कोमलतेला खुणवून[1],
प्रेमाच्या वसतीकरितां
जगदंतर[2] फुलवूं आता.
दिव्य सुरांनी[3]
गीते गाउनि
विश्वाला निजवायला
वाऱ्याचा बनवूं झोला. २
फेकुनि द्या इकडेतिकडे
थोडेसे दंवबिंदु गडे,
या निर्मल अवकाशात
प्रेमाचें पेरूं शेत,
दिव्यमोहिनी[4] -
सर्वे गुंगुनी
विश्वाला वत्सलतेने
प्रेमाचे गाऊ गाणे. ३
सरितांच्या लहरींवरती
नाचूं या निर्भयचित्ते;
अर्धोत्मीलित फुलवोनी
लपूं चला कलिकांत कुणी;
कविहृदयांत
गरके घेत
जाउनिया खेळूं आतां
ही गाणी गातां गातां. ४
एखादी तरुणी रमणी
रमणाला आलिंगोनी,
लज्जामूढा भीरूच ती
शंकित जर झाली चित्तीं,
तिच्याच नयनीं
कुणी बिंबुनी
धीट तिला बनवा बाई;
भुलवा ग, रमणालाही. ५
सुखस्वप्नांनीं गुंगवुनी
पुण्यात्मे हसवा कोणी;
आशा ज्या त्यांच्या चित्तीं,
त्याच रचा स्वप्नांवरतीं;
दयितचिंतनी
विरहभावनीं;
दिवसां ही झुरली बाला,
भेटूं द्या स्वपती हिजला. ६
अनेक असले खेळ करूं,
प्रेमाशा विश्वांत भरूं,
सोडुनिया अपुले श्वास
खेळवुं नाचवुं उल्हास;
प्रभातकाळीं
नामनिराळीं
होउनिया आपण राहूं;
लोकांच्या मौजा पाहूं. ७

१. सुंदर ते ते नटवून, कोमल तेते खुलवून.
२. जग सगळे.
३. दिव्य रवानी गाणी गाउनि.
४. मंदयामिनी.

... याकवितेतील या तारका १६-१७ वर्षे वयाच्या मुलीच्या मनोवृत्तीच्या, निरागस मुक्तपणे हसणाऱ्या, खेळणाऱ्या, बोलणाऱ्या. चोहीकडे शांत शांत अशा दाटलेल्या आकाशीच्या निळ्या अंगणात, कुणि नाही ना अशा वेळी, आपणाला कुणि पाहात नाही ना, असा अंदाज घेत, लाजत लाजत, हळूच हासत, एकेक पाऊल पुढे टाकत, 'खेळ गडे खेळू काही' असे म्हणत जमायला लागतात. आणि शुभ्रधवल चांदणपऱ्यांना शोभणारा खेळ खेळू लागतात. गाणे गाण्याच्या या खेळात त्या रंगत जातात. आपण साऱ्या विश्वाला कसं सुंदरतेनं सजवायचं-नटवायचं आणि कोमलतेनं खुलवायचं हे सारं त्यांच्या खेळगाण्यात गुंफू लागतात.

त्यांच्या या गाण्याशी, गाता-खेळता त्या इतक्या एकरूप होतात की त्या जे जे गातात, ते ते क्रियात्मक



अनुक्रमणिका

होऊन जणू काही प्रत्यक्ष अनुभवतात, असं आपल्या रसिकतेला जाणवू लागतं. इच्छित करीत असलेले ते त्यांच्या गाण्यातील स्वप्नील अनुभव आपल्याला जणू दिसायला लागतात.

...दिसायला लागतात– त्या तारका विविध प्रकारच्या क्रीडानंदात रंगलेल्या. रात्रीच्या पहिल्या प्रहरी सारं जग प्रेमाच्या वसतीसाठी फुलवून टाकणाऱ्या. विश्वबाळाला जोजवण्यासाठी वाऱ्याचा झूला बनविण्याची लगबग करणाऱ्या. सकाळच्या रामप्रहरी जे दवबिंदू दिसतात, ते रात्रप्रहरी इकडेतिकडे फेकून देणाऱ्या. त्याचबरोबर निर्मल आकाशीच्या निळ्या-हिरव्या शेतात गुलाबरंगी प्रेम पेरत असलेल्या. स्वर्गीय मोहनभारीत वृत्तीने साऱ्या विश्वाला वत्सल प्रेमाचे गाणे गाणाऱ्या. त्या वत्सल प्रेमगाण्याच्या धुंदीत सरितांच्या अवखळ लाटांवर निर्भयपणे मुक्त नर्तन करणाऱ्या. त्यातील कुणी अर्ध्यामुर्ध्या उमललेल्या कलिकांना पूर्ण फुलवून त्यात लपाछपीचा खेळ खेळणाऱ्या. तर कुणी बालकवींसारख्या कवींच्या संवेदनशील अंतरात शिरून गरगर गरके घेत गाणे गाण्याचा खेळ खेळणाऱ्या. काहीशा किशोरवयीन वृत्तीच्या या तारका स्वतः प्रेमात न पडता, सहृदय मैत्रिणींसारख्या रमण-रमणीच्या प्रेमाला मात्र मदत करणाऱ्या. एखादी घाबरट लाजरी-बुजरी प्रेयसी, आपल्या प्रियकराला आलिंगन देताना कंशानंतरी उगीचच शंकित झाली, तर तिच्या डोळ्यांत शिरून तिला धीट बनविणाऱ्या. तर कुणी त्या प्रियकराला तिच्यासाठी भुलवून टाकणाऱ्या.

हे त्यांचे बरेचसे प्रेमाचे खेळगाणे ऐकता ऐकता आणि तसे पाहता पाहता, आपल्या आस्वादक सर्जनशीलतेला दिसू लागतं. या गाण्यातील त्यांनी इच्छिलेला काहीसा एक गंभीर खेळ.– जे पुण्यशील आत्मे सतत ध्यानीमनी जगाच्या कल्याणाची उदात्त अशी आशादायक सुखस्वप्ने बाळगीत असतात, त्या स्वप्नांच्या पूर्ततेसाठी त्यात सामील होऊन, त्या पुण्यात्म्यांच्या चेहऱ्यावर हास्य फुलवतात. आणखी एक वेगळा गंभीर संवेदनशील खेळ. आपल्या प्रिय पतीपासून विरह झालेल्या, त्याच्याद्दल चिंताग्रस्त झालेल्या, त्याच्या भेटीसाठी झुरत असलेल्या त्या विरहिणीची तिच्या पतीबरोबर भेट घडवून आणतात. आणि शेवटी त्यांच्या या खेळगाण्याच्या समारोपात आपल्याला दिसतं– त्यांच्या श्वासाश्वासांतून प्रेम, आशा, उल्हास पेरत पेरत त्या निघून जात आहेत. पण लुप्त होता होता थोड्याशा मिश्किल होत, नामानिराळ्या होत आहेत. कुठंतरी दिगंतरी लपून या इहलोकीच्या लोकांच्या मौजा बघत राहात आहेत.

आणि आपण त्यांचं हे खेळगाणे ऐकतच राहात आहोत.

हा जो सुंदर अनुभव ही कविता आपल्याला देते आहे, तिचं रूप कसे आहे ?...

१) या कवितेतील तारका, गाणे गाता गाता, त्या गाण्यातून काय करू इच्छितात ते तृतीयपुरुषी निवेदन करीत मी तुमच्यासमोर मांडलं. पण या कवितेचे रूप तृतीय पुरुषी नाही. ते रूप प्रथम पुरुषी आहे. त्यामुळे तिला आत्मरंगी सौंदर्य प्राप्त झाले आहे.

मी तृतीय पुरुषी निवेदन केल्यामुळे, या कवितेतील कितीतरी गंमत कमी होत असते असं आपल्याला जाणवत असतं. अशा निवेदनामुळे कवितेतील सौंदर्याचा अनुभव घेण्यात काहीशी गद्यता येते, रुक्षता येते, कसलीतरी उणीव जाणवत असते.

वस्तुतः या तारका स्वतःच गाणे गात, गाता गाता आपण कसला खेळ खेळणार आहोत हे एकमेकींना स्वतःच सांगत आहेत... 'रात्रीच्या पहिल्या प्रहरी, आपण सुंदरतेला नटवू या. आणि कोमलतेला खुलवू या. आणि सारं आख्खं जग प्रेमानं फुलवून टाकुया. प्रेमानं भरून टाकू या आणि मध्यरात्रीनंतर बरं का, वाऱ्याचा छानसा झूला बनवून, त्यात विश्वबाळाला निजवून स्वर्गीय अंगाईगीत गाऊ या.' आणि पुढे त्या तशाच गात गात, 'ग... गडे' ची सलगी साधत एकमेकींना सांगत आहेत, 'सकाळच्या रामप्रहरी हिरव्या हिरव्या तृणांकुरांवर जे तिळ दवबिंदू साऱ्यांना दिसणार आहेत ते फेकून द्या इकडेतिकडे थोडेसे दवबिंदु गडे. आणि साऱ्या आकाशभर अगदी क्षितिजांपर्यंत प्रेमाची फुलेच फुले पेरू या अन् फुलवू या' अशा भावाशयाच्या प्रथमपुरुषी आत्मरंगी रुपामुळे या कवितेत एक सलगीचा हासरा, खेळता जिवंतपणा खेळत राहिला आहे. हे हासत खेळत गाणारे जिवंत गाणे झाले आहे.

२) वस्तुतः संध्यासमयानंतर आकाशात लुकलुक करीत एकीमागोमाग दिसणाऱ्या त्या जडरूप चांदण्या. पण

आकाशीच्या ग्रहगोलातील त्या चांदण्यांना प्रतिभेच्या पंखावर बसून, बालकवी, त्या जडरूपांना चैतन्याची मानवी रूपे देतात. मग आपल्या अंगणातील परकरी पोरींसारख्या त्या खेळतात. नाचतात. हळूच हसतात. तशाच लाजतात. कुठेतरी लपतात. कशात तरी गिरक्या घेतात. कुणा रमणीला प्रेमाचा खेळ शिकवतात, तिच्यासाठी रमणाला भुलवतात. लोकांच्या मौजा पाहातात, साऱ्याच या मानवी तारका, तुमच्यातीलच मिश्किल, थट्टेखोर चालत्या बोलत्या मैत्रिणींसारख्या.

३) तारकांखेरीज या कवितेत आलेला वारा, दवबिंदू, आकाश, सरिता, लाटा, कलिका, प्रभात– हा सारा नेहमीचाच निसर्ग. पण कविप्रतिभेच्या स्पर्शाने त्याला आगळेच सौंदर्य प्राप्त झाले आहे. त्यांना चांदण्यांसारखं मानवी रूप दिलेले नसले तरी प्रतिभास्पर्शित वेगळे सौंदर्यरूप लाभले आहेच.

...वाहाणारा वारा कसा, तर विश्वाला निजवायला तारकांनी केलेला झोला असा. दवबिंदू कसे, तर रात्रीच्या प्रहरी तारकांच्या हातानी फेकूनि दिलेले इकडे तिकडे असे. आकाश कसे, तर जे निर्मल आणि ज्यात तारकांनी प्रेमाचे शेत पेरले आहे असे. सरितालहरी कशा, तर ज्यांच्यावर तारका निर्भयचित्ती नर्तन करीत आहेत अशा. कलिका कशा, तर ज्या अर्धोन्मीलित असून, ज्यांना पूर्ण फुलवून, त्यांच्यात तारका लपत आहेत अशा. प्रभातकाळ कोणता तर नामानिराळं होऊन तारका लोकांच्या मौजा पाहात आहेत तो.

४) निसर्गातील सौंदर्याचं रूप बघून आनंदमग्न होणं हा बालकवींच्या प्रतिभेचा धर्म आहे. त्यामुळे त्यांच्या इतर कवितांप्रमाणेच याही कवितेत ते रूपसंवेदन जाणवतेच. निर्मल आकाश, नभांगणातील तारका, वाऱ्याचा झोला, सरिता लहरी, पेरलेलं शेत, अर्धोन्मीलित कलिका, प्रभात काळ, इकडेतिकडचे दवबिंदू असं निसर्गसन्मुख रूपसंवेदन या कवितेत जाणवतेच आणि लज्जामूढा रमणाला आलिंगन देणारी रमणी या मानवी रूपसौंदर्यातील स्पर्शसंवेदनही जाणवते.

पण या रूपसंवेदनेला जोडून येणारं गतिसंवेदन (Kinetic sensation) या गतिसंवेदनानं ही कविता भरभरून गेल्याचं प्रत्ययाला येत असतं. गाण्याला सप्तस्वरांच्या आरोह-अवरोहांची गती असते आणि या गाण्याच्या खेळात, खेळालाही गती असते. त्यामुळे या कवितेतील गाण्यात, खेळात गतिसंवेदन आशयाशी एकरूप होऊन वाहात असते.

'या ग या' म्हणत त्या तारका पुढे पुढे येत राहातात. लाजत लाजत, हळूच हासत 'खेळ गडे खेळू काही' म्हणत खेळत राहातात. खेळता खेळता सुंदरतेला नटवतात. कोमलतेला खुणवतात. विश्वमंडलाच्या अंतरंगाला फुलवतात. वाऱ्याचा झोला करतात. त्यात विश्वबाळाला निजवतात. त्याला दिव्य स्वरांचे अंगाई गीत गातात. 'फेकुनि द्या इकडेतिकडे' म्हणत थोडेथोडे दवबिंदू फेकत राहातात. निर्मल आकाशात प्रेमाचे शेत पेरतात. हे सारं करून झाल्यावर सरितालहरींवर निर्भयपणे नर्तन करतात. अर्धोन्मीलित कळ्यांना फुलवतात. त्यात लपतात. कवींच्या हृदयात गरके घेण्याचा खेळ खेळतात. कुणी रमणीच्या डोळ्यांत शिरून रमणाच्या आलिंगनासाठी तिला धीट बनवतात. कुणी जगासाठीच्या सुखस्वप्नात कार्यशील असणाऱ्या पुण्यात्म्यांना हसवतात. कुणी झुरणाऱ्या विरही बालिकांची पतिभेट घडवून आणतात. या सर्व प्रकारच्या गाण्यात-खेळात रूपसंवेदनेबरोबरच गतीचे संवेदन प्रकर्षाने जाणवत असते.

५) नादमधुरतेचे संवेदन हे बालकवींच्या इतर कवितांप्रमाणेच या कवितेत अगदी कविताभर निनादत असते.

'कुणि नाहीं ग कुणि नाही, पुढे पुढे, लाजत लाजत, खेळ गडे खेळू, गाणी गाता गाता' अशा शब्दाशब्दाच्या द्विरुक्तिपूर्ण आवर्तनाने हे नादमधुर संवेदन जाणवत असते. तसेच 'लाजत लाजत हळूच हांसत, सुंदरतेला नटवून । कोमलतेला खुणवून, दिव्य सुरांनी । गीते गाउनि, दयितचिंतनी । विरहभावनी, प्रभात काळीं । नामानिराळी' अशी प्रासादपूर्ण यमकसाधित समांतरता नादमधुरतेच्या लाटांवर लाटा निर्माण करीत असते.

त्याचबरोबर 'फेकुनि द्या इकडे तिकडे । थोडेसे दंवबिंदु गडे, सरितांच्या लहरींवरती । नाचूं या निर्भयचित्तीं, एखादी तरुणी रमणी । रमणाला आलिंगोनी, खेळवुं नाचवुं उल्हास' अशी बहुसंख्य मृदु व्यंजनांची लयताल साधणारी प्रासपूर्ण रचना काहीसा स्पर्श संवेदनमिश्रित

नादमाधुर्याचा कोवळा अनुभव देत असते आणि सुंदरता, कोमलता, जगदंतर, दवबिंदू, निर्मल, दिव्यमोहनी, सरितालहरी, अर्धोन्मीलित, रमण-रमणी, आलिंगन लज्जामूढ, दयितचिंतन, विरहभावना, उल्हास, प्रभातकाळी, नामानिराळी, अशी सर्वत्र केलेली मृदुमधुर शब्दांची पखरण, कविताभर निनादत असते.

६) निसर्ग आणि मानवी व्यवहार यातील अमूर्त भावसौंदर्य व्यक्त करणारे शांतता, सुंदरता, कोमलता, निर्मलता, दिव्यता, वत्सलता, निर्भयता, प्रेममयता, आशा, उल्हास, लज्जा असे भावभारित अलवार शब्द– यांची एक वेगळी नोंद करण्यासारखी या शब्दांचं येथील दृश्य रूप, त्यांचं नादसंवेदन आणि ते अमूर्त भावसौंदर्य यांची एकरूपता, त्या त्या भावाची विलक्षण आनंदघन प्रत्यय देणारी असते.

७) किशोर-तरुण सीमारेषेवरील निष्पाप बालिकांमध्ये भावणारं स्त्रीमन- त्या स्त्रीमनाची सुकुमारता, मिष्किलता, अवखळ उच्छृंखलता, खेळकरपणा, हळुवारपणा, कोवळी नाजुकता- हे सारं रोमँटिक संप्रदायातील स्त्रीमनाचं अवखळ-खेळकर दर्शन या कवितेत होत असतं.

कुणि नाही न असा अंदाज घेत, लाजत लाजत, हसत, हसत पुढं पुढं येणं, 'या ग... खेळ गडे खेळू' असं त्यांचं सलगीचं 'ग... गडे' संबोधित बोलणं, सुंदरतेला नटवणं, कोमलतेला खुणवणं, कुणालातरी निजवायला झूला बनवणं, त्यात कुणाला निजवणं, वत्सलतेनं अंगाई गाणं, मुक्तपणे नाचणं, कलिकात वा कुठंतरी लपालपी खेळणं, कुणाच्या हृदयात गरके घेणं, कुठल्यातरी रमणीला रमणांच्या प्रेमाच्या भेटीगाठीसाठी धीट बनवणं, झुरणाऱ्या विरही बालिकेला पतिभेट घडवणं, सर्वत्र आनंदीआनंद पेरणं आणि हे सारं करून नामानिराळं बाजूला होऊन या आणि अशाच मौजा पाहणं, त्या मौजांचा आनंद भोगणं हा सारा तुमच्यातलाच अवखळ-सुंदर स्त्रीस्वभाव या तारकांमध्ये किती सुरेख रीतीने पेरलाय !

– हे तारकांचे गाणे म्हणजे तुमच्यासारख्या निष्पाप. अवखळ, खेळकर बालिकांचे गाणे– असा प्रत्यय देणारे हे कविता-गाणे, आणि स्वतः कवीही तारकांशी, तुमच्याशी आणि शब्दांशी खेळत गातो आहे, असे हे दिव्य मोहन-गाणे !

प्रा. एम्. पी. पाटील
सी-२५/१५, जीवन-विमा नगर, बोरीवली (पश्चिम), मुंबई ४०० १०३.

## अभयसाधक, कर्मयोगी बाबा आमटे

'अश्रू गाळायला वेळ नाही... !' अश्रू गाळीत वेळ घालविण्याऐवजी अश्रूंच्या महापुराला आपल्या दोन हातांनी थोपविण्यात जीवन कृतार्थ केलेले सेवाव्रती बाबा आमटे यांनी इहलोकीची यात्रा संपविली. बाबांनी रंजल्या, गांजल्या, उपेक्षित, किळसवाण्या दुःखाला आपलेसे करून मायेने त्यांचे जीवन आनंदमय करण्यात... 'ज्यालांची फुले' करण्याचा आपला चिरयज्ञ पुढीलांच्या समर्थ हाती सोपविला. परलोकात काही दुःख आहे का ते दूर करण्यासाठी बाबांनी इहलोकीचा निरोप घेतलां. कर्तव्यपूर्तीचे समाधान, गांधीवादी जीवनमूल्यांचे कृतीशील आचरण, महारोग्यांसाठी आनंदवन, मूकबधिरांसाठी 'शारदानिकेतन' अशिक्षित युवकांसाठी 'युवाग्राम', ज्येष्ठांसाठी 'उत्तरायण', 'हेमलकसा-अशोकवन-सोमनाथ... इ. प्रकल्परूपाने त्यांनी मानवी जीवनाला आत्माभिमान देऊन जीवनात आनंदाची उद्याने निर्मिली. नर्मदा आंदोलनातही ते उतरले होते. खऱ्या अर्थाने 'येथ दुःख रूचीसि आले !' १९८५ साली युवक बिरादरीची स्थापना करून 'भारत जोडो' यात्रा घडविणाऱ्या बाबांनी 'मानव जोडो'ची जीवनयात्रा संपविली. ती सर्वांना प्रेरणादायी आहे. त्यांच्या साहित्यात आणि काव्यात हाच दुर्दम्य जीवनवाद आहे. ९४ वर्षांच्या प्रदीर्घ आयुष्यातील आपला आणि आपल्याबरोबर आपल्या कुटुंबियांचा क्षण-न्-क्षण सेवाकार्यास वाहिलेल्या सेवाव्रती, अभयसाधक, कर्मयोगी बाबा आमटे यांना महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे ही भावपूर्ण श्रद्धांजली !



अनुक्रमणिका

# ‘प्रतिभापर्व’ : स्वाती महाळंक

## (राष्ट्राध्यक्षा प्रतिभाताईंच्या जीवन प्रवासाचे चित्रण.)




☐ पद्माकर मा. कुलकर्णी

श्रीमती प्रतिभाताई पाटील देशाच्या पहिल्या महिला राष्ट्राध्यक्षा झाल्या नि भारताच्या इतिहासात एक सोनेरी पान लिहिले गेले. प्रतिभाताईंची राष्ट्राध्यक्षापदासाठी उमेदवारी जाहीर झाली तशी प्रतिभाताई म्हणजे नेमक्या कोण हे जाणून घेण्याची अनेकांना जिज्ञासा होती. सुमारे ४०-४५ वर्षे राजकारणात राहून, अनेक खात्यांची मंत्रिपदे भूषवूनही प्रतिभाताई प्रसिद्धी पराङ्मुख असल्यामुळे त्यांच्या कारकीर्दीची अनेकांना फारशी माहिती नव्हती. साहित्यक्षेत्रात नुकतेच दाखल झालेले, स्वाती महाळंक यांनी लिहिलेले “प्रतिभापर्व” हे चरित्रात्मक लिखाण वाचकांची ही जिज्ञासा निश्चितरित्या भागवेल.

‘प्रतिभापर्व’ मध्ये लेखिकेने प्रतिभाताई पाटील यांचा संपूर्ण राजकीय जीवनप्रवास शब्दबद्ध केला आहे. प्रतिभाताई खानदेशाच्या कन्या नि विदर्भाच्या स्नुषा. जळगावातील छोट्याशा नाडगावमध्ये एका खानदानी रजपूत कुटुंबात त्यांचा जन्म झाला. त्यांचे वडील नानासाहेब जळगावातले नामवंत विधिज्ञ होते. प्रतिभाताईंचे थोरले काका दिवाणबहादूर डोंगरसिंह रामजी पाटील हे राजकीय क्षेत्राशी जवळीक ठेवून होते. दिल्लीच्या ‘लेजिस्लेटिव्ह कौन्सिल’चे ते सतत बारा वर्षे सदस्य होते. दुसरे एक काकाही दहा वर्षे या कौन्सिलचे सदस्य होते. प्रबोधनकार ठाकरे, आचार्य अत्रे, डॉ. आंबेडकर, हरिभाऊ पाटसकर आदी दिग्गजांशी दिवाणबहादूर डोंगरसिंह यांचे मैत्रीचे संबंध होते. त्यामुळे पाटील कुटुंबाला महाराष्ट्राच्या राजकारणाचा स्पर्श झाला. वडील व काकांनीच प्रतिभाताईंना राजकारणात प्रवेश करायला उद्युक्त केले नि मग प्रतिभाताईंनी कधी मागे वळून बघितलंच नाही. आमदारकीपासून सुरू झालेली त्यांची वाटचाल उपमंत्री, विविध खात्यांची मंत्रिपदे, विरोधी पक्षनेत्या, प्रदेश काँग्रेस समितीच्या अध्यक्ष, राज्यसभेच्या उपसभापती, राज्यपाल अशी अनेक वळणे घेत पुढे गेली. राष्ट्राध्यक्षपदी झालेल्या निवडीने त्यावर सोन्याचा कळस चढविला. ही गेल्या ४०-४५ वर्षांतील राजकीय वाटचाल अत्यंत लक्षवेधक आहे. ती एकत्रित स्वरूपात फारशी कुठे उपलब्ध नव्हती. ती शब्दबद्ध करून स्वाती महाळंक यांनी पार पाडली आहे. हा संपूर्ण जीवनप्रवास लेखिकेने सोप्या, साध्या भाषेत आणि अभ्यासपूर्णरित्या आपल्यापुढे मांडला आहे. त्यांची शैलीही रसाळ व प्रासादिक आहे. एरवी राजकीय क्षेत्रातील कारकीर्द प्रासादिक भाषेत मांडणे हे तसे सोपे काम नव्हे. इतर कामाचा अनुभव आणि वाचकांची नेमकी समजलेली नस, यामुळे त्यांनी ते अत्यंत लालित्यपूर्ण भाषेत वाचकांसमोर मांडले आहे.

प्रतिभाताईंच्या राजकीय कारकीर्दीबरोबरच त्यांचे कौटुंबिक जीवनही यामध्ये अपरिहार्यपणे येते. मात्र राजकीय घोडदौड सुरू असतानाही प्रतिभाताईंनी संसाराचा सांभाळलेला तोल लक्षणीय आहे. त्यांचे यजमान डॉ. देविसिंह शेखावत यांनी त्यांना दिलेली साथ, प्रतिभाताईंनी जिवापाड जपलेले नातेसंबंध, चुकून कधीतरी निर्माण झालेले ताणतणाव, त्यातून दोघांनीही सामंजस्याने काढलेला मार्ग; आणि अंती या सगळ्यामधून प्रतीत होणारे प्रतिभाताईंचे

सांजवातीसारखे सौम्य शांत व्यक्तिमत्त्व मनाचा ठाव घेते. अशा प्रसंगातील अनेक बारकावे लेखिकेने नेमकेपणाने टिपले आहेत. जुने राजकीय संदर्भ, प्रतिभाताईंच्या बालपणापासूनचा नेमका आलेख, त्यामध्ये त्यांच्याबरोबर असलेली मंडळी, अनेक घटनांची पार्श्वभूमी आदी बाबी लेखिकेने अत्यंत अभ्यासपूर्वक व ओघवत्या भाषेत मांडल्या आहेत. त्यामुळे हे पुस्तक वाचनीय ठरले आहे.

प्रतिभाताईंनी राजकारणात असूनही कधी गलिच्छ राजकारण केले नाही. पदे, सत्ता यांच्या मागे न लागता त्यांनी कायम रचनात्मक कार्यावर भर दिला. पददलितांसाठी, महिलांसाठी, अल्प-भूधारकांसाठी त्यांनी अनेक संस्था चालविल्या, स्थापन केल्या. महत्त्वपूर्ण निर्णय घेतले. शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे पगार ट्रेझरीमधून देण्याचा निर्णय हा शिक्षण मंत्री असताना प्रतिभाताईंनी घेतलेला सर्वांत महत्त्वाचा निर्णय म्हणावा लागेल. प्रतिकूल परिस्थितीतही त्यांची पक्षावरील तसेच गांधी कुटुंबावरील निष्ठा अढळ राहते आणि त्याच बरोबर कौटुंबिक जीवनही समर्थपणे सांभाळता येते, हाच प्रतिभाताईंच्या वाटचालीचा संदेश आहे, असे लेखिकेने म्हटले आहे. त्याचे पुरेपूर प्रत्यंतर पुस्तक वाचताना येते. प्रतिभाताईंच्या कौटुंबिक जीवनातील प्रसंग अत्यंत हृदयस्पर्शी शब्दात मांडलेले आहेत. मात्र त्यांचा सारा जीवनप्रवास मांडताना, कोठेही केवळ व्यक्तिपूजा होईल,. अशा रीतीने लिहिण्याचा मोह लेखिकेने टाळला आहे.

पुण्याच्या डायमंड पब्लिकेशनने अत्यंत आकर्षक स्वरूपात हे पुस्तक प्रसिद्ध केले आहे. आकर्षक मुखपृष्ठ, रेखीव छपाई आणि प्रतिभाताईंच्या बालपणापासून राष्ट्राध्यक्षापदाच्या शपथविधीपर्यंत सारा प्रवास दाखविणाऱ्या दुर्मिळ रंगीत छायाचित्रांची सोळा पाने यामुळे हे पुस्तक अत्यंत उठावदार झाले आहे. प्रतिभाताईंची राष्ट्राध्यक्षापदासाठी उमेदवारी जाहीर झाल्यांतर केवळ पंधरा दिवसांत हे पुस्तक तयार करण्यात आले आहे. हे पुस्तक राष्ट्राध्यक्षा प्रतिभाताई पाटील यांची नेमकी आणि अधिक चांगली ओळख वाचकांना करून देईल यात शंका नाही.

'प्रतिभापर्व' - लेखिका : स्वाती महाळंक,
प्रकाशक : डायमंड पब्लिकेशन्स, पुणे.
पृष्ठे : १२५, मूल्य : शंभर रुपये फक्त.

**पद्माकर मा. कुलकर्णी**
४, पराग, सदिच्छा गृह निर्माण संस्था,
विजापूर रोड, सोलापूर - ४१३ ००४.

## साभार पोच

- चिगूर नंतरच्या कविता - शिवाजी नामा गवळी, चिगूर प्रकाशन, मनमाड, ऑगस्ट २००७.
- मी उंच, मी उंच (प्रवास) - सुरेश पिंगळे - 'निर्मिती' पुणे.
- साहित्यसम्राट न. चि. केळकर - अरविंद ताटके, 'मीनल', कोल्हापूर, मे २००७
- शहीद भगतसिंग - प्राचार्य व. न. इंगळे, 'संकेत' औरंगाबाद २००७.
- अहिल्याबाई होळकर - ओं. व. नजन, 'साकेत', औरंगाबाद २००७.
- सावित्रीबाई फुले - जी. ए. उगले 'साकेत' औरंगाबाद, २००७.
- गुरूवंदना - दीपक भागवत - 'मीनल', कोल्हापूर २००७.
- मराठी स्त्रीची अस्मिता - नीलिमा भावे, 'ग्रंथाली', मुंबई जुलै २००७
- मोहनमाया - रामदास भटकळ - मौज, मुंबई, ऑक्टोबर २००७.
- सौंदर्यशास्त्राचे स्वरूप - पी. डी. चौधरी - मराठी जनसाहित्य (अमरावती), ऑक्टोबर २००४.
- आर्थिक निकष आणि आरक्षण - शामसुंदर मुळे - अनुबंध, पुणे, ऑक्टोबर २००७.
- श्रीचूडामणि महाराज - डॉ. भीमाशंकर देशपांडे - देशपांडे साहित्य संशोधन, आत, गुलबर्गा, जुलै २००७
- घटातील गंगोदर - डॉ. भीमाशंकर देशपांडे - देशपांडे साहित्य संशोधन, आळंत, गुलबर्गा, जुलै २००६
- प्राचीन संत हस्तलिखिते - प्रा. कृष्णा गुरव - 'पश्यंति', कोल्हापूर, डिसेंबर २००७.
- एका साळियाने (आत्मचरित्र) - लक्ष्मीनारायण बोल्ली - पद्मगंधा, पुणे, मे २००७.
- मालविका (काव्य)-विश्वास वसेकर-स्नेहवर्धन, पुणे, नोव्हेंबर २००७.
- वॉल्ट व्हिटमन यांच्या कविता - अनुवाद - भगवान ठग - महाराष्ट्र अनुवाद प्रकाशन, बुलढाणा, २००७.
- निर्मोही कर्मयोगी - डॉ. सौ. अपर्णा रायरीकर - लीनता, पुणे २००७.
- स्पर्श सुवर्णाचा (ललित) - शीला निपुणगे - चंद्रकला, पुणे २००७.
- रावसाहेब पटवर्धन - आरती पाचलग - रा. पटवर्धन साधना, पुणे, स्मारक समिती.
- अच्युतराव पटवर्धन - अनिरुद्ध देवचक्के - महाराष्ट्र सर्वोदय मंडळ, मुंबई.
- जन्म कवितेचा - कविता कुलकर्णी - सिग्नेट, पुणे २००५.
- श्री. के. क्षीरसागर - सं. डॉ. शकुंतला क्षीरसागर - प्रकाशक सौ. उपाध्ये, पुणे २००७.
- दृश्यांतर - स्वातंत्र्यानंतरची मराठी कविता - संपादन - चंद्रकांत पाटील - एन.बी.टी., इंडिया २००७.
- गगनगंध (काव्य) - संपादन - डॉ. शंतनू चिंधडे, चंद्रकला, पुणे २००८.
- छावणीच्या कविता - ज्ञानेश्वर कोळी - सुयश, पुणे २००७.
- वैदिक न्यायतत्त्वशास्त्र - अडॅ. भास्करराव आव्हाड, अनुवाद प्रकाशक, सिग्नेट, पुणे २००७.

# कार्यवृत्त
# नोंद

(०१ डिसेंबर २००७ ते २९ फेब्रुवारी २००८)

☐ **डॉ. माधवी वैद्य,** प्रमुख कार्यवाह

**दि. २७ नोव्हेंबर २००७ : अहिताग्नी राजवाडे स्मृतिदिनः**

'१९ वे शतक - इतिहास संशोधन आणि ऐतिहासिक ललितलेखन' या विषयावर डॉ. राजा दीक्षित यांचे व्याख्यान झाले. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला व कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी स्वागत आणि प्रास्ताविक केले. डॉ. राजा दीक्षित यांचा सत्कार पुष्पगुच्छ देऊन केला. डॉ. माधवी वैद्य यांनी आभार मानले.

**दि. २९ नोव्हेंबर २००७ :**

कै. कमांडर मधुकर केशव लेले प्रथम स्मृतिदिन : 'महात्मा गांधी आणि एकविसावे शतक' या विषयावर डॉ. वि. वि. घाणेकर यांचे व्याख्यान झाले. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला व




कै. चिं. वि. जोशी पारितोषिक वितरण समारंभ :
डावीकडून स्वप्नील पोरे, मकरंद टिल्लू, प्रा. मिलिंद जोशी, प्रा. द. मा. मिरासदार, डॉ. वि. भा. देशपांडे.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी पुष्पगुच्छ देऊन डॉ. घाणेकरांचा सत्कार केला. कै. कमांडर म. के. लेले यांचा परिचय करून दिल्यावर डॉ. घाणेकरांनी प्रस्तुत विषयावर आपले व्याख्यान दिले. डॉ. माधवी वैद्य यांनी कुसुमाग्रजांची 'पुतळा' ही कविता वाचून दाखविली. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी समारोप केला व आभार मानले.

**दि. २५ डिसेंबर २००७ :**

श्री. म. माटे स्मृतिदिन : डॉ. सौ. कल्याणी दिवेकर यांनी प्रास्ताविक केले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या हस्ते वक्ते श्री. मधू नेने यांचा सत्कार करण्यात आला. 'श्री. म. माटे यांची विचार दृष्टी' या विषयावर मधु नेने यांचे व्याख्यान झाले. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी अध्यक्षीय समारोप केला. स्थानिक कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी आभार मानले.

**दि. २६ ते २९ डिसेंबर २००७ :**

**का. र. मित्र व्याख्यानमाला :**

दि. २६ ते २९ डिसेंबर असे चार दिवस दरवर्षीप्रमाणे डॉ. पु. ग. वैद्य, राजन खान, डॉ. आनंद यादव व कवी विठ्ठल वाघ यांची अनुक्रमे 'आजचे बालसाहित्य', 'आजची मराठी कथा', 'संत तुकाराम-एक आकलन', व 'शेतकरी आणि मराठी कविता' अशा विविध विषयांवर व्याख्याने झाली. या चारही दिवसांची प्रास्ताविके डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, डॉ. पुरुषोत्तम काळे, श्री. ह. ल, निपुणगे, नंदा सुर्वे यांनी केली. डॉ. माधवी वैद्य, डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या हस्ते पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आले. दरवर्षीप्रमाणे या व्याख्यानमालेस चारही दिवस श्रोत्यांची भरपूर उपस्थिती होती.

**दि. २२ व २३ डिसेबर २००७ :**

म. सा. परिषद, पुणे व वार्शी शाखा आयोजित विभागीय साहित्य संमेलनाचा वृत्तांत याच अंकात इतरत्र दिला आहे.

**दि. २ जानेवारी २००८ :**

'जॅकपॉट' या बहुचर्चित पुस्तकाच्या लेखिका सरिता वाकलकर यांची मुलाखत डॉ. सौ. कल्याणी दिवेकर यांनी घेतली. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. सरिता वाकलकर व इंदिरा पब्लिशिंग हाऊसच्या प्रकाशिका यांचे पुष्पगुच्छ देऊन डॉ. माधवी वैद्य व श्री. ह.




म. सा. परिषद मोफत-कायदा-सल्ला केंद्राचे उद्घाटक ॲड. भास्करराव आव्हाड (मध्यभागी) त्यांच्या डावीकडे प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य, उजवीकडे कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे आणि सल्ला केंद्राचे प्रमुख परिषदेचे कार्यवाह ॲड. प्रमोद आडकर भूमिका स्पष्ट करताना.

ल. निपुणगे यांनी सत्कार केला. सूत्रसंचलन महेंद्र मुंजाळ यांनी केले. आभार प्रदर्शन डॉ. माधवी वैद्य यांनी केले.

**दि. १४ जानेवारी २००८ :**

कै. वि. स. खांडेकर स्मृतिदिन : 'रूपक कथांचे वाचन' हा अभिनव उपक्रम सादर झाला. सूत्रसंचालन डॉ. पुरुषोत्तम काळे यांनी केले. प्रास्ताविक डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. परिषदेच्या पदाधिकाऱ्यांनी खांडेकरांच्या रूपक कथांचे प्रभावी वाचन केले. डॉ. पुरुषोत्तम काळे व डॉ. माधवी वैद्य यांनी प्रारंभी वि. स. खांडेकरांचे अल्पचरित्र उपस्थितांसमोर कथन केले. डॉ. सतीश देसाई- 'सज्जन पाखरू' ॲड. प्रमोद आडकर - 'विचित्र दुःख', नंदा सुर्वे - 'महासागर', प्रा. मिलिंद जोशी– 'महत्त्वाकांक्षा', डॉ. काळे यांनी 'दगडफोड्या' व 'उपभूक्त', डॉ. माधवी वैद्य यांनी 'हिवाळ्यातील पानं', 'डोळा', या रूपककथांचे वाचन केले. शेवटी डॉ. न. म. जोशी यांनी विचार प्रगट केले.

**दि. ६ फेब्रुवारी २००८ :**

'कॉफी क्लब'चे उद्‌घाटन पत्रकार व कवी उत्तम कांबळे यांच्या उपस्थितीत झाले. कांबळे यांनी त्यांच्या कवितांचे वाचन केले. प्रत्येक महिन्याच्या पहिल्या व तिसऱ्या बुधवारी दरमहा रु. ५०/- वर्गणी भरून या क़ॉफी क्लबचे सभासदत्व घेता येईल. उद्‌घाटनालाच सुमारे ३०/४० सभासद झाले.

**९ फेब्रुवारी २००८ :**

ॲडव्होकेट प्रमोद आडकर यांच्या बहुमोल सहकार्याने सुरू झालेल्या मोफत कायदेशीर सल्ला केंद्राचे उद्‌घाटन संस्थेच्या विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष डॉ. भास्करराव आव्हाड यांचे हस्ते झाले. ॲड. प्रमोद आडकर यांनी आपली साहित्यिकांना मोफत कायदेशीर सल्ला देण्यासंबंधीची तळमळ व्यक्त केली आणि साहित्यिकांना या सल्ला केंद्राचा लाभ अवश्य घ्यावा असे आवाहन केले. याप्रसंगी डॉ. भास्करराव आव्हाड यांनी संस्थेच्या नव्या उपयुक्त कार्याचे कौतुक केले. या प्रसंगी प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य उपस्थित होत्या. कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांनी आभार मानले.

**दि. ११ फेब्रुवारी २००८ :**

नाट्य विभाग : संगीत सौभद्र नाटकास १२५ वर्षे झाली. त्यानिमित्ताने सौभद्रमधील काही भागांचे संस्कृतमधून नाट्यवाचन झाले. निर्मलाताई गोगटे, धनंजय जोशी, अतुल खांडेकर, प्रतिभा दाते, अंजली गाडे, अश्विनी हिंगे यांनी नाट्यवाचनात भाग घेतला. राजीव परांजपे व प्रसाद हिंगे यांनी साथसंगत केली. सूत्रसंचालन डॉ. माधवी वैद्य यांनी, प्रास्ताविक डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. प्रा. मिलिंद जोशी यांनी आभार मानले. पंडित वसंतराव गाडगीळ यांनी संस्कृतमधून या रंगतदार कार्यक्रमाचा समारोप केला.

**१२ फेब्रुवारी २००८ :**

चिं. वि. जोशी पारितोषिक वितरण समारंभ : कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक प्रा. मिलिंद जोशी यांच्या 'हसण्यावारी' या पुस्तकास प्रा. द. मा. मिरासदार यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. याप्रसंगी 'चिं. वि. जोशी यांचा विनोद' या विषयावर त्यांचे व्याख्यान झाले. प्रकाशकासाठी असलेले पुरस्कार प्रा. आशा मुसळे यांना मिळाला.

या कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. परीक्षक सर्वश्री स्वप्नील पोरे, मकरंद टिल्लू यांनी मनोगत व्यक्त केले. परिषदेच्या कार्यवाह स्वाती महाळंक यांनी स्वागत व सूत्रसंचालन केले. डॉ. पुरुषोत्तम काळे यांनी आभार मानले. प्रा. मिलिंद जोशी यांचा परिचय करून दिला.

**२९ फेब्रुवारी २००८ :**

'काव्य आणि काव्योदयकर्ते वासुदेव बळवंत पटवर्धन : जीवन आणि लेखन' या (कै.) डॉ. सरोजिनी वैद्य यांच्या ग्रंथास रा. श्री. जोग पुरस्कार ज्येष्ठ साहित्यिक प्रा. के. रं. शिरवाडकर यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. प्रा. शंकर वैद्य यांनी हा पुरस्कार स्वीकारला. राजहंस प्रकाशनाला देण्यात आला. श्री.दिलीप माजगावकर यांनी तो स्वीकारला.

कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे यांनी श्री. माजगावकर यांचा परिचय करून दिला.

पुरस्कार स्वीकारल्यानंतर प्रा. शंकर वैद्य आणि श्री. दिलीप माजगावकर यांनी मनोगत व्यक्त केले. परीक्षकांच्या वृतीने प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे यांनी विचार मांडले.

डॉ. माधवी वैद्य यांनी डॉ. सु. रा. चुनेकर आणि प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे यांचा सत्कार केला. कार्यवाह स्वाती महाळंक यांनी स्वागत व सूत्रसंचालन केले.

श्रीमती मृणालिनी गडकरी यांचे 'रवींद्रनाथांची कविता' या विषयावर व्याख्यान झाले.

श्री. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.



अनुक्रमणिका

# शाखावृत्त

## सोलापूर शाखा

**दि. २५ ऑक्टोबर २००७ :**

कोजागिरी आनंद पौर्णिमा : या निमित्ताने दत्ता हलसगीकर यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले. विजया जहागीरदार, निर्मला मठपती, लक्ष्मी नारायण बोल्ली, लता अकलूजकर, शोभना सागर, वंदना कुलकर्णी, हेमकिरण पत्की, इत्यादींनी आपल्या बहारदार कविता सादर केल्या. प्रास्ताविक डॉ. सुहास पुजारी, आभार प्रेमचंद्र मेने व सूत्रसंचालन सीमा होसूरकर यांनी केले.

**दि. १८ नोव्हेंबर २००७ :**

'मधुराभक्ती मयुरी अक्कम महादेवी' या शशिकला मडकी लिखित ग्रंथाचे 'माजी कुलगुरू सोलापूर विद्यापीठ डॉ. इरेश स्वामी' यांच्या हस्ते प्रकाशन झाले. डॉ. अशोक कामत यांची प्रमुख उपस्थिती होती. दत्ता हलसगीकर अध्यक्षपदी होते व सूत्रसंचालन पद्माकर कुलकर्णी यांनी केले.

**दि. १२ डिसेंबर २००७ :**

त्र्यं. वि. सरदेशमुख स्मृतिव्याख्यान : 'सहवासातील सरदेशमुख सर' या विषयावर अनेकांनी सरांविषयी एक एक हृद्य आठवण सांगितली. प्रेमचंद्र मेने यांनी सूत्रसंचालन केले. समारोप डॉ. पुजारी यांनी केला.

**दि. १५ डिसेंबर २००७ :**

साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाल्याबद्दल डॉ. रंगनाथ तिवारी व प्रा. निशिकांत ठकार (हिंदी अनुवाद) तसेच 'हास्यसम्राट' प्रा. दीपक देशपांडे यांचा मा. डॉ. गो. मा. पवार यांच्या हस्ते सत्कार झाला. तिन्ही सत्कार मूर्तींनी मनोगत व्यक्त केले.

कार्यवाह

---

## शहापूर शाखा

**दि. १२/१/२००८ :**

प्रा. भालचंद्र वाकचौरे यांचे 'ज्ञानेश्वरीतील कर्मयोग' या विषयावर व्याख्यान झाले. प्राचार्य भालचंद्र देवडीकर प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. तत्पूर्वी दिवंगत डॉ. य. दि. फडके यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

कार्यवाह

---

## कोरेगाव शाखा

शाखेच्या वतीने परिसरातील मान्यवरांच्या उपस्थितीत म.सा.प. पुणेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकरांना यांनी श्रद्धांजली वाहण्यात आली.

कार्यवाह

---

## वाई शाखा

लो. टिळक स्मारक संस्थेच्या सहकार्याने लो. टिळक पुण्यतिथीच्या निमित्ताने चंद्रशेखर टिळक यांचे भाषण झाले. दि. २२ ऑगस्ट रोजी डॉ. गं. ना. जोगळेकर यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

कार्यवाह

---

## जळगाव शाखा

**दि. १० डिसेंबर २००७ :**

लक्ष्मीनारायण बोल्ली यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले. लेखिका सुरेखा शहा प्रमुख अतिथी होत्या. मिलिंद वागुल यांनी सूत्रसंचालन केले.

प्रास्ताविक प्रा. दिनेश पाटील यांनी केले. प्रा. पी. बी. चौधरी यांनी आभार मानले. अध्यक्ष नारायण शिरसाळे यांनी स्वागत केले.

**दि. २१ डिसेंबर २००७ :**

प्रा. केशव मेश्राम, म. वा. धोंड, डॉ. सरोजिनी वैद्य यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी सभा आयोजित केली होती.

**दि. २३ डिसेंबर २००७ :**

प्रा. भगवान पाटील लिखित 'सपन' कथासंग्रहांचे प्रकाशन प्रा. मधुकर निरफराके यांच्या अध्यक्षतेखाली व मा. भाई वैद्य यांच्या हस्ते झाले. प्रास्ताविक नारायण शिरसाळे.

नोंद - दीपक करंदीकर,
स्वीकृत सदस्य, पुणे.

---



अनुक्रमणिका

# विभागीय साहित्य संमेलन बार्शी-वृत्तांत

**२२/२३ डिसेंबर २००७ :**

द्वादशीक्षेत्र तथा बार्शी येथे शनिवार दि. २२ डिसेंबर व रविवार दि. २३ डिसेंबर २००७ असे दोन दिवस विभागीय साहित्य संमेलन संपन्न झाले.

य. प्र. पॉप्युलर एज्युकेशन सोसायटीचे शाह धारसी जीवन मॉडेल हायस्कूलच्या पटांगणावर 'राजा अंबरीषनगरी'चा भव्य मंडप उभारला होता. सकाळी शहराच्या मध्यवर्ती भागातून 'ग्रंथदिंडी' आयोजित करण्यात आली होती. बार्शीतील विविध संस्था, शाळा, संमेलन प्रतिनिधी व संमेलनाध्यक्ष कविवर्य श्री. विठ्ठल वाघ यांच्या उपस्थितीत अतिशय भव्य प्रमाणात 'ग्रंथदिंडी' आयोजिली गेली. सायंकाळी ४.४५ च्या सुमारास संमेलनाचे उद्घाटक मा. अरुण साधू (अध्यक्ष : अ. भा. म. साहित्य संमेलन) यांच्या उपस्थितीत उद्घाटन समारंभ सुरू झाला. आमदार राजेंद्र राऊत, माजी मंत्री दिलीप सोपल नियोजित अध्यक्ष विठ्ठल वाघ व म.सा.प.चे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे, प्र. कार्यवाह डॉ. माधवी वैद्य बार्शी शाखेचे अध्यक्ष : शामसुंदर मुळे व मसापचे विविध पदाधिकारी व्यासपीठावर उपस्थित होते. बार्शीचे सुपुत्र शाहीर अमरशेख यांचे नाव व्यासपीठाला देण्यात आले होते. शाहीर खाडे यांनी शाहीर अमरशेख यांनी रचलेल्या शिवछत्रपतींच्या जीवनावरील पोवाडाच्या गायनाने उद्घाटन समारंभास प्रेरक प्रारंभ झाला. दूरदर्शनच्या वृत्तनिवेदिका सौ. ज्योती अंबेकर व मुकुंदराज कुलकर्णी यांनी दोन्ही दिवशींच्या उद्घाटन व समारोप सोहळ्याचे सूत्रसंचालन केले. सर्व सन्माननीयांच्या हस्ते देवी सरस्वती, शिवाजी महाराज व डॉ. आंबेडकर व कै. डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या प्रतिमांना अभिवादन करून दीपप्रज्वलन झाले. स्थानिक कलाकारांच्या मधुर गायनाने श्री. मुकुंदराज कुलकर्णी यांच्या स्वागतगीताचे गायन झाले. त्याचवेळी मामासाहेब ग्रंथनगरीचे उद्घाटन डॉ. बी. वाय. यादव व कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांचे उपस्थितीत झाले. विभागीय संमेलनाच्या भव्य सभामंडपास आवर्जुन म.सा.प. पुणेचे दिवंगत कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे नाव देण्यात आले होते. सर्वश्री शामसुंदर मुळे, ॲड. प्रशांत शेटे, राजन मुठाणे, राजेंद्र राऊत, दिलीप सोपल, डॉ. वि. भा. देशपांडे, अरुण साधू व विठ्ठल वाघ यांची समायोचित भाषणे झाली. व्यासपीठावरील मान्यवरांचे सत्कार झाले. श्री. अरुण साधू यांच्या हस्ते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनावरील पुस्तकाचे व इतर तीन काव्यसंग्रहांची प्रकाशने झाली. श्री. पद्माकर कुलकर्णी यांनी आभार मानले. तसेच 'इये भगवंतांचिये नगरी' या स्मरणिकेचे प्रकाशन झाले. संमेलनास राज्यातील विविध भागातून साहित्यिक, कवी, वक्ते व स्थानिक रसिक बार्शीकरांचा प्रचंड जनसमुदाय लोटला होता. दोन दिवस चाललेल्या सर्व कार्यक्रमांना रसिकांची प्रचंड गर्दी झाली होती. उद्घाटन समारंभ पुष्कळ रंगतदार झाल्याने पूर्वनियोजित 'सांस्कृतिक कार्यक्रम' रद्द करून त्याऐवजी 'दंवातले आकाश' हे निमंत्रित कवींचे कविसंमेलन रात्री १० पर्यंत सादर झाले. सुरेश पाठक व माधव पवार यांनी कविसंमेलनाचे सूत्रसंचालन केले. राजेंद्र दास, नारायण सुमंत, हेमकिरण पत्की, उद्धव कानडे, सुरेश शिंदे, मीरा सिरसमकर, श. मा. पाटील, प्रमिला देशमुख, राजलक्ष्मी देशपांडे, बंडा जोशी, वसंत पापळकर, द. बा. जितकर, वासंती मेरू, नीलांबरी शिर्के, ज्ञानेश्वर कोळी, आश्लेषा महाजन, राजेंद्र अत्रे, सुनील शिनखेडे, मुबारक शेख, प्रकाश गव्हाणे, दत्ता गोसावी, शब्बीर मुलाणी, वैशाली नायकवडे, भीमराव धुळुबुळु, निर्मला मठपती, सुरेश मोहिते, मुकुंदराज कुलकर्णी, इ. कवींनी या कविसंमेलनात आपली एकेक रचना सादर केली. तसेच स्वतः संमेलनाध्यक्ष कविवर्य विठ्ठल वाघ यांनीही आपल्या काही रचना सादर केल्या.

भारतीय क्रांतिवीरांनी चेतविलेल्या बलिदानाच्या ज्योतीच्या इतिहासाचे सचित्र प्रदर्शन, कर्नाला चॅरिटेबल ट्रस्ट, ठाणे यांचे वतीने डॉ. गं. ना. जोगळेकर मुख्य सभा मंडपाच्या जवळच्या परिसरात या निमित्ताने भरविण्यात आले होते. डॉ. बी. एम. नेने आणि डॉ. वि. भा. देशपांडे यांचे उपस्थितीत २२ तारखेला सायंकाळी ह्या चित्रप्रदर्शनाचे उद्घाटन झाले. तसेच याच परिसरात ग्रंथप्रदर्शन व विक्री व्यवस्था असलेले अनेक स्टॉल्ससुद्धा उभारलेले होते. या दोनही ठिकाणी बार्शीकरांची अलोट गर्दी होत होती.

रविवार, दि. २३ डिसेंबर रोजी 'प्रसार माध्यमांतील मराठीचा वापर, काळजीचा विषय ?' या विषयावर प्रा. डॉ. द. ता. भोसले यांचे अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. डॉ. वि. भा. देशपांडे यांनी सूत्रसंचालन केले. नितीन केळकर, अरुण खोरे, प्रा. मिलिंद जोशी, सुधीर महाजन या विविध

माध्यमक्षेत्रातील वक्त्यांनी आपले विचार प्रकट केले. यानंतर लगेचच रावसाहेब मनगिरे यांच्या अध्यक्षतेखाली कथाकथनाचा बहारदार कार्यक्रम रसिकांच्या प्रचंड उपस्थितीत रंगत गेला. शर्मिला शहा, ज्योतिराम फडतरे, अनुराधा लिमये, श्याम सावजी, योगिराज वाघमारे या कथाकथनकारांनी आपल्या कथा सादर केल्या. त्यानंतर राष्ट्रीय स्तरावर प्रथम क्रमांक विजेती 'गप्पा' ही एकांकिका शा. अमरशेख व्यासपीठावर सादर झाली. हा साहित्य संमेलनातला अनोखा उपक्रम ठरला. विद्या सावळे व नीता देव आणि त्यांचे सहकारी यांचा 'गप्पा' एकांकिकेत सहभाग होता. यानंतर ऑस्करसाठी शिफारस झालेल्या 'श्वास' या मराठी चित्रपटातील बालकलाकार अश्विन चितळे व 'पक-पक-पकाकपक' या मराठी चित्रपटातील बालकलाकार सक्षम कुलकर्णी या दोघांच्या प्रकट मुलाखतीचा कार्यक्रम झाला. ही मुलाखत स्वाती महाळंक यांनी आयोजित करून घेतली. यावेळी व्यासपीठावर अश्विनची आई व सक्षमचे वडील, तसेच अरुणदादा बारबोले, डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. माधवी वैद्य, ज्योती आंबेकर उपस्थित होते. या सर्वांनीच विचारलेल्या प्रश्नांना दोन्ही बालकलाकारांनी समर्पक उत्तरे देऊन मुलाखत एका उंचीवर नेऊन ठेवली. शाळकरी मुलामुलींची प्रचंड उपस्थिती या मुलाखतीसाठी झाली होती. संपूर्ण दोन दिवसांच्या कार्यक्रमातील सर्वात लक्षवेधी असा हा मुलाखतीचा कार्यक्रम ठरला.

सायंकाळी ज्येष्ठ साहित्यिक ह. मो. मराठे यांच्या उपस्थितीत समारोप समारंभ झाला. सुभाष देशमुख, प्रभाताई झाडबुके, सर्व कार्यकारिणी सदस्य व्यासपीठावर उपस्थित होते. संमेलनाध्यक्ष विठ्ठल वाघ उपस्थित होते. निमंत्रक पद्माकर कुलकर्णी, डॉ. प्रशांत मोहिरे, डॉ. माधवी वैद्य, संमेलनाध्यक्ष कवी विठ्ठल वाघ, ह. मो. मराठे यांची भाषणे झाली. शेवटी अॅड. प्रशांत शेटे यांनी आभार मानले. या समारोप समारंभात व्यासपीठावर उपस्थितांचे व अन्य संबंधित व्यक्तींचे मानचिन्ह देऊन सत्कार करण्यात आले.

समारोप समारंभानंतर 'इंद्रधनु कवितेचे' ही स्थानिक कवींचा सहभाग असलेली काव्यमैफिल प्रा. वसंत पापळकर यांच्या अध्यक्षतेखाली झाली. डॉ. ना. पां. देशपांडे व मुकुंदराज कुलकर्णी यांनी सूत्रसंचालन केले.

निमंत्रित साहित्यिक कवी यांच्या निवास व भोजनाची उत्तम व्यवस्था दोन्ही दिवस केलेली होती.

शब्दांकन : दीपक करंदीकर

❖❖❖

## मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेशचा सुवर्णमहोत्सव

मराठीसाहित्य परिषद, आंध्र प्रदेश या संस्थेचा सुवर्ण महोत्सव दि. २९, ३० व ३१ मार्च या दिवशी महाराष्ट्र राज्याचे उप-मुख्यमंत्री माननीय श्री. आर. आर. पाटील यांच्या उपस्थितीत साजरा होत आहे. पहिल्या दोन दिवशी पंचधारेच्या सुवर्ण महोत्सवाचे निमित्त साधून 'वाङ्मयीन चळवळ व वाङ्मयीन नियतकालिके', 'मध्ययुगीन संत परंपरा व संगीत कला', आणि 'आधुनिक साहित्यातील अखिल भारतीय संदर्भात वास्तवाचे स्वरूप' या तीन विषयांवर चर्चा सत्रे आयोजित करण्यात आली आहेत. त्यात मराठी बरोबर तेलुगू, उर्दू, हिंदी भाषा, प्रांत व संस्कृती यांचाही विचार होणार आहे. तिसऱ्या दिवशीच्या कार्यक्रमांचे मुख्य पाहुणे उपमुख्यमंत्री राहणार असून प्रसिद्ध कवी श्री. ना. धों. महानोर अध्यक्षस्थानी असतील. या प्रसंगी आंध्र प्रदेश शासनातील महनीय व्यक्ती उपस्थित राहणार आहेत. हा तीन दिवसीय कार्यक्रम महाराष्ट्र राज्य मराठी विकास संस्थेच्या सहकार्याने होणार आहे. या कार्यक्रमात मराठी बरोबर तेलुगू, हिंदी, उर्दू भाषिक तज्ज्ञ व जाणकार निबंध सादर करणार आहेत.

या कार्यक्रमासाठी महाराष्ट्र व आंध्र प्रदेशाबाहेरील जिज्ञासू मंडळींना उपस्थित राहणे सोयीचे व्हावे म्हणून त्यांच्या तीन दिवसांच्या फक्त निवास भोजनाची व्यवस्था म.न.पा. आं. प्र. या संस्थेमार्फत केली जाणार असून दि. २० मार्च पर्यंत नावे नोंदविणाऱ्यांनाच ही सोय देणे शक्य होईल. सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने मराठी महाविद्यालयाच्या माजी विद्यार्थांचा मेळावा आयोजित होणार आहे. त्यात भारतीय चित्रकला व संस्कृती संदर्भ हा विषय आंतरराष्ट्रीय कीर्तीचे कला इतिहासकार व चित्रकलेचे नामवंत संग्राहक श्री. जगदीश मित्तल हा विषय हाताळीत असून अंकात दुर्मिळ मौल्यवान अशा चित्रांच्या प्रतिकृती छापल्या जात आहेत.

अधिक माहितीसाठी कार्यालयाशी संपर्क साधावा.

कळावे,

आपलो

**विद्या देवधर**

कार्यवाह, मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश, इसामिया बाजार, हैदराबाद.



अनुक्रमणिका






# नवीन आजीव सभासद

## २४ डिसेंबर २००७ ते २९ फेब्रुवारी २००८

१) खैरे निखील माधव (पुणे)
२) जोगळेकर केतकी संचय (सांगली)
३) साने रवीकिरण काशिनाथ (पुणे)
४) महाजन उद्धव निंबा (पुणे)
५) कदम अंजली तानाजीराव (अकलूज)
६) वाकलकर सरिता शंकरराव (पुणे)
७) कदम तानाजीराव राजाराम (अकलूज)
८) कदम सोनल राजाराम (अकलूज)
९) मगर चित्रलेखा महादेव (जंजिरा)
१०) आळंगेकर मंजुषा राजेंद्र (पुणे)
११) बांबळे मीना पांडुरंग (पिंपळे-गुरव)
१२) लोहार अनिल चिंधू (अंमळनेर)
१३) कुलकर्णी बाळासाहेब बाळकृष्ण (पुणे)
१४) रेळे नीता (पुणे)
१५) कुदळे विजय बाळकृष्ण (पुणे)
१६) वले वासुदेव सोमाजी (पाचोरा)
१७) पाटील भीमराव नारायण (पाचोरा)
१८) नेरकर नारायण महादू (पाचोरा)
१९) सोनवणे प्रकाश भिकाजी (पाचोरा)
२०) गायकवाड चंद्रकला रमेश (पाचोरा)
२१) महाजन उज्वला अशोक (पाचोरा)
२२) महाजन अशोक जयराम (पाचोरा)
२३) अहिरे अजय भास्कर (पाचोरा)
२४) चिंचोळे राजेंद्र जे. (पाचोरा)
२५) मांडोले सुनीता राजेंद्र (पाचोरा)
२६) तावरे प्रतापराव दत्तात्रय (पाचोरा)
२७) फडणीस माधुरी चंद्रकांत (पाचोरा)
२८) शिंदे सुरेखा संजय (पाचोरा)
२९) शेळके माधवी रमेशराव (पाचोरा)
३०) परदेशी प्रतिभा राजेंद्रसिंह (पाचोरा)
३१) पाटील अरुणा सुनील (पाचोरा)
३२) पाटील योगेश चिंधा (खडक देवळा)
३३) पाटील शामकांत दयाराम (भडगाव)
३४) पाटील हेमलता शामकांत (भडगाव)
३५) मराठे दीपक मोतीराम (भडगाव)
३६) तांदळे दिनेश हरिभाऊ (भडगाव)
३७) तांदळे ज्योती दिनेश (भडगाव)
३८) कोळी सुरेश आनंदा (भडगाव)
३९) तायडे पितांबर काशीराम (भडगाव)
४०) पाटील प्रकाश दतू (भडगाव)
४१) बावळे अर्जुन सावळाराम (भडगाव)
४२) बिऱ्हाडे शरद लहू (फैजपूर)
४३) टाक घनःश्याम झंबकलाल (कळमघरे)
४४) मोरे विजय पद्य (पहुरपेठ)
४५) सुरळकर दिनकरराव त्र्यंबकराव (पहुरपेठ)
४६) कासोदे दीपध्वज (मुक्ताईनगर)
४७) मोरे चंद्रकांत रघुनाथ (जामनेर)
४८) पांढरे रवींद्र माणिकराव (पहुरपेठ)
४९) खराटे पी. एल. (जळगाव)
५०) पाटील साहेबराव श्रीपत (पाचोरा)
५१) पाटील अनिल प्रकाश (खडकदेवळा)
५२) दिवटे विनायक सखाराम (भडगाव)
५३) पाटील सुधीर जगन्नाथ (पाचोरा)
५४) चव्हाण रवींद्र भिकनराव (पाचोरा)
५५) कुमावत देवानंद रामदास (पाचोरा)
५६) पाटील वाल्मिक अरुण (अंतुर्ली)
५७) काबरा ममता महेंद्र (जळगाव)
५८) काबरा महेंद्र नारायण (जळगाव)
५९) वानखेडे रवींद्र मानू (रावेर)
६०) पाटील ममता किसन (जळगाव)
६१) पाटील ज्ञानेश्वर मधुकर (चिंचोली)
६२) परदेशी ज्ञानेश्वर तुकाराम (आखतवाड)
६३) जगताप प्रतिभा विश्वास (जळगाव)
६४) भोसले हरि कृष्ण (कासेगाव)
६५) कदम विद्या भीमराव (पुणे)
६६) गायकवाड उज्वला मोहन (वाकड)
६७) तरस सीमा बबनराव (किवळे)
६८) दिमके पुरुषोत्तम शिवदास (दिघी)
६९) सोनवणे प्रताप पंढरीनाथ (निगडी)
७०) देव संजय दामोदर (नागपूर)
७१) देशकर राजेंद्र कृष्णराव (नागपूर)
७२) कडसकर अपर्णा विनायक (पुणे)
७३) डहाके वासुदेव उदेभान (नरखेड)
७४) वाल्हेकर तारा प्रभाकर (पुणे)



## देणगीदार

| क्र. | दिनांक | नाव | रक्कम | |
|---|---|---|---|---|
| १) | २४-१२-२००७ | पुणे बुक फेअर | ३०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| २) | २५-१२-२००७ | श्रीमती आसावरी काकडे | १०००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ३) | १२-०१-२००८ | श्री. डी. व्ही. जोशी | ५००/- | योगक्षेमार्थ देणगी |
| ४) | ५-०२-२००८ | महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई | ५,००,०००/- | अनुदान |
| ५) | ६-०२-२००८ | डॉ. मीरा धांडगे-कै. नारायण धांडगे यांच्या स्मरणार्थ | २५०१/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ६) | ९-०२-२००८ | श्री. चंद्रकांत शेवाळे | १५००/- | योगक्षेमार्थ देणगी |





अनुक्रमणिका






Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : January to March 2008
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57



बुक-पोस्ट




प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे-४११०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.

अनुक्रमणिका